## अभंग. १७७

कर्म आटाआटी केली बहुपरी ॥ चित्त शुद्धि जरी नाहीं झाली ॥ १ ॥ तरी ते अखेर नाहीं कीं साधली ॥ घरबुडी झाली प्राण्या तुझी ॥ ध्रु० ॥ दृढ उपासना जन्मवरी केली ॥ स्थिरता न झाली जरी चित्ता ॥ तरी ते अखेर० ॥ २ ॥ प्रखर वैराग्य देहीं साधियेलें ॥ पुढें कां इच्छिलें वैकुंठादि ॥ तरी ते ० ॥ ३ ॥ आजन्म हे भक्ति प्रयत्नें साधून ॥ आत्मनिवेदन झालें नाहीं ॥ तरी ते ० ॥ ४ वेदादि अभ्यासें संपादिलें ज्ञान ॥ निमाली वासना जरी नाहीं ॥ तरी ते० ॥ ५ ॥ सद्गुरूची सेवा केली अनुदिन ॥ कृपासंपादन नोहे अंतीं ॥ तरी ते अखेर ० ॥ ६ ॥ हंसदास ह्मणे बुधबळांचे खेळीं ॥ नाहीं जरी झाली प्यादेमात ॥ तरी ते अखेर नाहीं कीं साधली ॥ घरबुडी झाली० ॥ ७ ॥

उपदेशपर अभंग समाप्त.

## शिष्याचीं लक्षणें.

## अभंग. १७८

माझी स्त्रिया पुत्रें माझा हा संसार ॥ येथें देव थोर कासयाचा ॥ १ ॥ कासयाचा धर्म कैंचें पापपुण्य ॥ वृथा जपध्यान कोण करी ॥ २ ॥ कासया अतिथि अभ्यागत स्नान ॥ तीर्थादिकें जीवा फळ कायी ॥ ३ ॥ हंसदास ह्मणे बुद्धि भ्रंश ऐसा ॥ रजसहवासा अंगीं उठे ॥ ४ ॥

## अभंग. १७९

सुखदेखतांचि दृष्टी ॥ आशा उपजली पोटीं ॥ १ ॥ तृप्त न होतां आवडी ॥ पडे संतापाची बेडी ॥ २ ॥ दुःख झालिया अंतरीं ॥ उठे मोहाची भरारी ॥ ३ ॥ नेणें जाय आठवण ॥ बुद्धि जातां विमरण ॥ ४ ॥ हंसदास ह्मणे पात ॥ रजोगुणें ऐसा होत ॥ ५ ॥

## अभंग. १८०

चित्त वयाचा भरवसा ॥ मानी धरोनीयां आशा ॥ १ ॥ कन्या पुत्र गृह दारा ॥ ह्मणे माझा हा निधारा ॥ २ ॥ जैसा स्वस्थ जीवें ॥ मूर्ख बैसे फुटके नावें ॥ ३ ॥ परी हंसदास ह्मणे ॥ खास नयाशीं बुडणें ॥ ४ ॥

## अभंग.१८१

मायबापामारीलाता ॥ वंदीमस्तकींवनिता ॥ १ ॥ देवींभक्तींवैरकरी ॥ अन्यथातेंजीवीं धरी ॥ २ ॥ करुनीसंत अनादर ॥ होयपोटाचाकिंकर ॥ ३ ॥ हंसदासह्मणेऐसा ॥ जनजायनरकवासा ॥ ४ ॥

## अभंग.१८२

कडूवृंदावनशर्करेंघोळीलें ॥ मधुरत्वा आलेंघडेचिना ॥ १ ॥ पलांडुचे-अंगामर्दिलीकस्तूरी ॥ सुगंधभीतरीनाहेनोहे ॥ २ ॥ कुटुंबकाबाडीप-पंचीकतैसा ॥ योग्यउपदेशाबोलूंनये ॥ ३ ॥ हंसदासह्मणे नवज्वरीता सी ॥ नयेची कामाशीदुग्धजैसें ॥ ४ ॥

## अभंग.१८३

गाढवाशीउटीचंदनाचीकेली ॥ जायकाशोभली त्याचे अंगा ॥ १ ॥ कस्तूरीचा टिळाहत्याच्याकपाळा ॥ काऊळ्याशींमाळ मोतीयांची ॥ २ ॥ घुबडाशीं रत्न नारळमर्कटा ॥ पाषांडीनर्कटावेदजैसा ॥ ३ ॥ हंसदास ह्मणेपाखंडीजेऐसे ॥ त्याशीं ज्ञानीं नसे अधिकार ॥ ४ ॥

## अभंग.१८४

धादनीभावना ॥ तोचिजाणासच्छिष्य ॥ १ ॥ सद्गुरूचेंउणें ॥ जयामनें-साहेना ॥ २ ॥ ऋद्धिसिद्धिनसतां ॥ भयचित्तावागवी ॥ ३ ॥ गुणागळेभा री ॥ हंसदासतें अधिकारी ॥ ४ ॥

## अभंग.१८५

गुरूयेतांदाराशिष्यलपेघरा ॥ सांगेरांडापोरां ह्मणानाहीं ॥ १ ॥ अव-चितांयेऊनीजरीउभाराहे ॥ लवेचिनादेहदुष्टाचाज्या ॥ २ ॥ गुरूकाजीं-देहा आपदालागती ॥ ह्मणोनीदुर्मनी आज्ञालंघी ॥ ३ ॥ हंसदासह्मणेऐ सें आचरण ॥ देहाचें वंचनहोतां झालें ॥ ४ ॥

## अभंग.१८६

गुरूबरोबरी बोलेसरोत्तरीं ॥ अथवावेखरीदु रुत्तरें ॥ १ ॥ कांहीं अपे क्षितगुरूनेंइच्छिलें ॥ ह्मणेरेंवियेलें तुझ्याबापें ॥ २ ॥ गुरूसांगतीगा-हिनपाहेंकांहीं ॥ ह्मणेकांरेडोयीउठविली ॥ ३ ॥ हंसदासह्मणेऐसें आ-चरण ॥ वाणीचें वंचन होताझालें ॥ ४ ॥

अभंग १८७

गुरूचें मानस नाचरीं अमुक ॥ मनें अवश्यक आचरीनें ॥ १॥ अमुक करी तां आह्मास सुख भारी ॥ तयाशीं अव्हेरी महाखळ ॥ २॥ एक धरी पोटीं एक बोले ओठीं ॥ सद्गुरुशीं कष्टी नष्ट करी ॥ ३॥ भाव वरिवरी कापट्य अंतरीं ॥ पाहे कागापरी गुरुन्यून ॥ ४॥ हंसदास ह्मणे ऐसें आचरण ॥ मनाचें वंचन होतां झालें ॥ ५॥

अभंग १८८

मज पूर्णज्ञान आतां ठसावलें ॥ काय राहियेलें तुझ्या हातीं ॥ १॥ चिण चिण करिशी तरि सुखें करीं ॥ व्यर्थ गुरगुरी शीण तुला ॥ २॥ तुझ्या कृपेनें आह्मि झालों सिद्ध ॥ आतां शापदग्ध होऊं किना ॥ ३॥ ऐकें होणा वर्ती ऐसा महानष्ट ॥ जाणतोचि स्पष्ट असच्छिष्य ॥ ४॥ हंसदास ह्मणे तया नाहीं गति ॥ चंद्रसूर्यस्थिति नरकवास ॥ ५॥

अभंग १८९

नाहीं सद्गुरूचा तोष ॥ संपादिला अवघा रोष ॥ १॥ तरि महाहानी झाली ॥ आता नाहीं तिही ताळीं ॥ २॥ शिवविष्णु ब्रह्मा थोर ॥ अवघे करिती दूर दूर ॥ ३॥ कोणी घालीना पाठीं ॥ जेथें तेथें कुटाकुटी ॥ ४॥ तरि हंसदास ह्मणे ॥ तोष गुरूचा करणें ॥ ५॥

शिष्याचे लक्षणाचे अभंग समाप्त.

---

## गुरुमाहात्म्याचे अभंग.

अभंग १९०

इष्टदैवत तो श्रीगुरूचि आह्मा ॥ शिवविष्णुब्रह्मा आह्मी नेणों ॥ १॥ नेणों रामकृष्ण नेणों पांडुरंग ॥ एकचि अभंग गुरु पाहों ॥ २॥ नेणों जपजाप्य नेणों तीर्थव्रत ॥ नेणों पुत्र आप्त धनदारा ॥ ३॥ नेणों बंधमुक्ति नाविरक्ति ॥ नेणों ऽपरतिज्ञानाज्ञान ॥ ४॥ हंसदास ह्मणे श्रीगुरु वांचून ॥ आह्मी नेणों आन कांहीं एक ॥ ५॥

अभंग १९१

आनंदप्रगटे दुःखसर्व आटे ॥ जन्ममृत्यू तुटे जयासंगें ॥ १ ॥ तोचि गुरुराज शब्दू निजगूज ॥ ब्रह्मापद रज इच्छी ज्याचें ॥ ध्रुपद ॥ सायुज्याचा दानी कैवल्याची खाणी ॥ जो कामोक्ष पाणी दीनबंधु ॥ तोचि ०॥ २ ॥ मुमुक्षुचातका जलधरनीका ॥ भवाब्धीं जो नौका बुडतीया ॥ तोचि ० ॥ ३ ॥ काळाचा नियंता निर्विकार स्वतां ॥ विग्रहा जो धर्ता भक्तकाजा ॥ तोचि ० ॥ ४ ॥ परत्रीं आधार विश्रांतीचा थार ॥ सुखाचें माहेर मायेवीण ॥ तोचि ० ॥ ५ ॥ ऐसा पूर्णपणीं शब्दू निरंजनीं ॥ भेद कडसणी वाव जेथें ॥ तोचि ० ॥ ६ ॥ हंसदास ह्मणे तेथें लोटांगण ॥ सप्रेमें अनन्य माझें भावें ॥ तोचि गुरुराज शब्दू निजगूज ॥ ब्रह्मापद रज इच्छी ज्याचें ॥ ७ ॥

## अभंग १९२

निर्विकल्प माझा स्वामी तो सद्गुरु ॥ जेथें कल्पतरु नुपमवे ॥ १ ॥ निष्कामाचे सरी आणि तां ही काय ॥ सरी पावे गाय कामधेनु ॥ २ ॥ चंचळ लक्ष्मी निश्चळाचे सरी ॥ बोलतां वैखरी शीणमात्र ॥ ३ ॥ हंसदास ह्मणे तो हे निवर्णन ॥ ह्मणोनि वंदन मौनेंची त्या ॥ ४ ॥

## अभंग १९३

मोठे दानशूर नाना दानें देती ॥ संतां सम होती घडेचीना ॥ १ ॥ शिबी हरिश्चंद्र अथवा तो बळी ॥ येतीच नातुळीं संताचिया ॥ २ ॥ नाहीं देखियेलें नाहीं ऐकियेलें ॥ तेंचि संतीं दीलें निजपद ॥ ३ ॥ हंसदास ह्मणे व्हावें उतराई ॥ ठेउनीया डोयी संतपदीं ॥ ४ ॥

## अभंग १९४

सद्गुरु वांचून ॥ शिष्य तरे ना प्रमाण ॥ १ ॥ तेवि शिष्याचीण वाय ॥ बोध सद्गुरूचा होय ॥ २ ॥ रूपवती नारी ॥ शिणे बुळीया भ्रतारीं ॥ ३ ॥ हंसदास ह्मणे पति ॥ त्रासे वंध्या स्त्री संगति ॥ ४ ॥

## अभंग १९५

जाणता देवाशीं ॥ संत नाम हें तयासी ॥ १ ॥ तरी तयापाशीं जावें ॥ अवघें मांजकपुसावें ॥ २ ॥ सत्संगा वांचून ॥ कदा नोहे नोहे ज्ञान ॥ ३ ॥ दास ह्मणे हंस गुरू ॥ शक्य वाराया अंधारू ॥ ४ ॥

## अभंग १९६

असोनसोसिद्धि ॥ स्वानुभवेंजोप्रबोधी ॥ १ ॥ महाज्ञानी भक्तपूर्ण ॥ वैराग्याचीसांठवण ॥ २ ॥ प्रेमळ भजक ॥ सिद्ध असोनीसाधक ॥ ३ ॥ हंसदासह्मणे जनसूरवी ॥ व्हावेसद्गुरु ओळखी ॥ ४ ॥

अभंग १९७

सिद्धि सामर्थ्यदाउनी ॥ लोकाजनींभेडावी ॥ १ ॥ नाहीं नाहींतें करिती ॥ जलोमहं नित्याची ॥ २ ॥ भक्तिनातेंज्ञान ॥ दंभशीण अवघा ॥ ३ ॥ नेणि असद्गुरु ॥ हंसदासाचानिर्धारु ॥ ४ ॥

अभंग १९८

सद्गुरुवांचुन ॥ धुंडिताहें त्रिभुवन ॥ १ ॥ ब्रह्मात्मैकनाबोधाया ॥ नाहीं समर्थसरखया ॥ २ ॥ तोचि तरलानारी ॥ असिकीया भवसागरीं ॥ ३ ॥ परीहे हंसदासह्मणे ॥ नोहेरामदासाविणें ॥ ४ ॥

अभंग १९९

सकळमंगळासद्गुरुमंगळ ॥ तयाअमंगळकोणह्मणे ॥ १ ॥ ह्मणेलजो कोणीपाहावानादिठी ॥ शोधितांहेसृष्टिचांडाळतो ॥ २ ॥ चांडाळाचा-स्पर्शजाहला असेल ॥ स्मरणेंनासेलसद्गुरूच्या ॥ ३ ॥ मगझाल्याभेटीकिंवा चरणस्पर्श ॥ कोणह्मणेदोषराहिलऐसें ॥ ४ ॥ ऐसाहानिर्द्धार सत्यसत्यवाणी ॥ सांगतगर्जेनी हंसदास ॥ ५ ॥

अभंग २००

वासनेचामळलागोंनेदी अंगा ॥ तोचीएकजगामाजी धन्य ॥ १ ॥ नयाचीउपाधीसकळसरली ॥ वृत्तिचीतोझालीनिरवृत्तिची ॥ २ ॥ नामरूपसारेंनिपटोनीगेलें ॥ अखंडसंचलेंपरतत्व ॥ ३ ॥ उपदेशघ्यावावाटलीयामनें ॥ हंसदासह्मणे तेथेंजावें ॥ ४ ॥

अभंग २०१

सद्गुरुरायाचें अंगचराचर ॥ व्यक्तनिराकार दोहींरूपें ॥ १ ॥ निराकार-मायासाकारजगत ॥ सर्वीसर्वगतगुरुराय ॥ २ ॥ ऐसागुरुदेवएकचि असतां ॥ वाटतसे भ्रांता भिन्नभिन्न ॥ ३ ॥ हंसदासह्मणे भिन्न-भिन्न कैसे ॥ पाहातातीजैसें अंधजगा ॥ ४ ॥

अभंग २०२

नेंधा ह्मनें सोमलखातां ॥ देहीं पुष्टी आरोग्यता ॥ १॥ तें चि भक्षि-ल्या अविधी ॥ पुसणें न को मृत्यु कधीं ॥ २॥ तैसें अनिवार हें मन ॥- होनां गुरुकृपा उन्मन ॥ ३॥ हंसदास ह्मणे तृप्ति ॥ स्वस्वरूपाचीहोय ऐती ॥४॥

अभंग २०३

परिसानें रागें लोहाशीं ताडिलें ॥ परि अंग झालें हेम त्याचें ॥ १॥ तैसा सज्जनाचा कोप पुरवला ॥ नीचें लोभ केला नये कामा ॥ २॥ रासभा-नें पृष्ठीं बैसविलें प्रीतीं ॥ परी ते फजीती अवघी जगीं ॥ ३॥ हंसदास ह्मणे रणीं अग्रे लात ॥ मारिली तरि ही होय भूषणचि ॥ ४॥

अभंग २०४

तें चि निरूपण त्याचें नांव कीर्तन ॥ संदेहाचें ठाण तुरे जेथें ॥ १॥ अधि-कार तो ही बोधाचा त्यालागीं ॥ स्वानुभवें अंगीं ब्रह्म झाला ॥ २॥ इतर तें वक्ते विधवाकुमारी ॥ आह्मांशीं अंतरीं मानती ना ॥ ३॥ मानेल जया शीं ऐको न ने स्मरवें ॥ आमुची या लेखें चाड नाहीं ॥ ४॥ सती हंसदासा हरिद्रा कुंकुम ॥ हा तें घेणें धर्म अहेवेच्या ॥ ५॥

अभंग २०५

परंपरा शब्द ज्ञान ज्याचें पूर्ण ॥ सद्गुरु तो मान्य वेदवंद्य ॥ १॥ वेदवंद्य जैसा कुलीन नृपती ॥ स्त्रियेशीं निश्चिती सकुळींच्या ॥ २॥ तेथोनी-जो बोध उपजला शब्द ॥ तो करि अभेद जीवशिवां ॥ ३॥ वृत्तिलय सा-क्षी प्रत्यय जो दावी ॥ सद्गुरु गोसावी तो ची साचा ॥ ४॥ हंसदासीं आ-ह्मीं शब्द चि सेविलें ॥ इतरा कथिलें त्याच्या हिता ॥ ५॥

अभंग २०६

जारापासोनी यां पुत्राशीं साधिती ॥ नांव सांगताती पतीचेंचि ॥ १॥ तैसा आल्यागेल्यापासोनि साधिला ॥ गुरुबोध त्याला ह्मणती मूढ ॥ २॥ परी तो अशब्द बोध समजावा ॥ होईना स्वभावा गति मंद ॥ ३॥ हंसदास ह्मणे न कळे या लोकीं ॥ परि परलोकीं दंड आहे ॥ ४॥

अभंग २०७

करामती दावी जनाशीं भुलवी ॥ मंत्र उठाठेवी चेटकाच्या ॥ १॥ मोह नें भरे रीं यंत्रें नानापरी ॥ कौटालें कुसरी साबराच्या ॥ २॥ औषधीम-

योग क्रियेचा म र्ग ॥ गीत रागरंग तानमान ॥ ३ ॥ इत्यादि सांगती ते गुरु म्हणविती ॥ मोक्ष ज्ञाने होती घडेचीना ॥ ४ ॥ हंसदास म्हणे खरें ज्या तर णीं ॥ गुरु कीजे तें ब्रह्मनिष्ठ ॥ ५ ॥

## अभंग २०८.

श्रोत्री ब्रह्मनिष्ठ सद्गुरुतो साचा ॥ एकें एकेकाचा कामा नये ॥ १ ॥ श्रोत्री आहे परी ब्रह्मनि ! नसे ॥ कुंकू नाहीं जैसें रजस्वले ॥ २ ॥ ब्रह्मनिष्ठ परी श्रोत्री नसे पाहीं ॥ जैसें वेश्ये नाहीं मंगळसूत्र ॥ ३ ॥ हंसदास म्हणे म्हणोनी दों चिन्हीं ॥ युक्त गुरु जनीं सच्छिष्याशीं ॥ ४ ॥

## अभंग २०९.

सकळही तीर्थी एकदांचि स्नान ॥ घडतां मज्जन सागराशी ॥ १ ॥ सकळ देवांची एकदांची भेटी ॥ आत्माराम दृष्टी देखिलीया ॥ २ ॥ एकदांचि भेटी सकळ संतांची ॥ मूर्ति सद्गुरूची निरखितां ॥ ३ ॥ हंसदास म्हणे कुबेर जोडतां ॥ नवनिधि हाता येती जैसे ॥ ४ ॥

## अभंग २१०.

तूंचि माझा पिता तूंचि माझी माता ॥ बंधु तूं देवता गुरुराया ॥ १ ॥ आपत्तीं वधीती पितरें लेंकुराशी ॥ तैसा तूं नोहेसी गुरुनाथा ॥ २ ॥ प्रसंग पडतां बंधु हारी प्राण ॥ नोहेशी निधान तैसा तूंगा ॥ ३ ॥ एकादिये वेळीं देवता घे बळी ॥ नव्हशी कदाकाळीं तूंगा तैसा ॥ ४ ॥ हंसदास म्हणे एकोनीयां कीर्ति ॥ आलों तुजप्रती शरणमी ॥ ५ ॥

## अभंग २११.

त्रिविध तापाचा हारक ॥ जगीं सद्गुरूची एक ॥ १ ॥ भवसिंधु पार नेता ॥ जगीं सद्गुरुचि दाता ॥ २ ॥ स्वात्मसुखाचे शयनीं ॥ कोण नेई गुरुवांचोनी ॥ ३ ॥ बोधें निजगुज द्यावें ॥ हें तों गुरुनें करावें ॥ ४ ॥ ऐसा अटळ कृपेचा ॥ गुरु सागरचि साचा ॥ ५ ॥ तया गुरुराया वंदन ॥ हंसदासाचें अनन्य ॥ ६ ॥

## अभंग २१२.

सकळ पदार्थ दृश्य नाशिवंत ॥ घडेना शाश्वत ध्यान त्याचें १ म्हणों ध्येय लक्ष सकळा देखणा ॥ विचारितां मनावीण अंध ॥ २ ॥ स्फुरणा वांचोनी कैंची मनबुद्धी ॥ तेणरूपामधीं लीन होय ॥ ३ ॥ म्हणोनियां ध्येय

नाते मन वृत्ति ॥ देखणा चिन्मूर्ति गुरुस्वयें ॥ ४ ॥ हंसदास म्हणे त्रिपु-
टी वांचून ॥ तेंचि शुद्ध ध्यान सद्गुरूचें ॥ ५ ॥

## अभंग २१३.

तीर्थावळी स्नान सप्तही सागरीं ॥ पदबिंदु शिरीं सद्गुरूचा ॥ १ ॥ एक
वेळे सर्व तीर्थेंही सुलभ ॥ गुरूचें दुर्लभ पदतीर्थ ॥ २ ॥ हंसदास म्ह-
णे श्रीगुरुचरण ॥ कृपासंपादन महालाभ ॥ ३ ॥

## अभंग २१४.

सार्थक घडावें प्रल्हादा अंतरीं ॥ नाहीं नरहरी कामा आला ॥ १ ॥ दा-
वियेलें बोल जायीं रे शरण ॥ सद्गुरु निधान तया भावें ॥ ध्रु० ॥ नामदेव
नेणे हरगवी संस्कृती ॥ देवें तयाप्रती संबोखूनी ॥ दावि० ॥ २ ॥ सगुणा-
चें सुख मानितां तुकया ॥ दाखवोनी तया स्वप्न देवें ॥ दा० ॥ ३ ॥ तुळशी
दासा हेत व्हावी रामभेटी ॥ भिवोनी शेवटीं पिशाचें त्या ॥ दावि० ॥ ४ ॥
मज हेत होता हंसदासम्हणे ॥ गिरिजारमणें काय केलें ॥ दा० ॥ ५ ॥

## अभंग २१५.

श्रेष्ठवर्णीस्वतां ॥ असोनीयां ब्रह्मवेत्ता ॥ १ ॥ तोचि सद्गुरुपरिपूर्ण ॥ जया
संगें शुद्धज्ञान ॥ २ ॥ इतरें निजहित हानी ॥ द्विजपावनसेज्जनीं ॥ ३ ॥ हं
सदास म्हणे सत्र ॥ अंत्यजाचें अपवित्र ॥ ४ ॥

## अभंग २१६.

चुना माखोनीयां बायसें निजांगा ॥ संपादिलें सोंगा हंसाचिया ॥ १ ॥ अ-
ज्ञ जनतेथें सकळ ठकले ॥ वर्म ओळखिलें चतुरेंचि ॥ २ ॥ समान दिस-
तां ठकती ना ज्ञानी ॥ खूण भिन्नजनीं ओळखीची ॥ ३ ॥ हंसदास म्ह-
णे हंसामुक्तचारा ॥ काकपाठमोरा होय तेथें ॥ ४ ॥

## अभंग २१७.

शुष्क भिक्षेलागीं नाहीं अडचण ॥ पाहिजे तेथून घ्यावी सुखें ॥ १ ॥
ऐशी मोकळीक नाहींच सिद्धान्तीं ॥ मुख्य श्रेष्ठवर्णी पक्षीं समीं ॥ २ ॥
अनादि पासोनी हाचि शिष्टाचार ॥ केल्या भ्रष्टाकार विपरीत ॥ ३ ॥ को
णी कैसें करो परीशिकवावें ॥ कळवळोनी जीवें बोलियेलों ॥ ४ ॥ हंस-
दासा श्रोत्री ब्रह्मनिष्ठा वीण ॥ सद्बोधसिद्धान्त घेणें नाहीं ॥ ५ ॥

## अभंग २१८.

ज्ञान अभिमान नाहीं जया अंगीं ॥ वेदीं भाव जगीं सर्वज्ञ जो १ तया पु-
रुषाशी शरण जावें ॥ अनन्यता भावें करोनीयां ॥ ध्रु० ॥ परदोष गु
ण नुच्चारी वाचे ॥ परदाराधनें नावलोकी ॥ तया० ॥ २ ॥ सर्वभूतीं द
या विषयीं उदास ॥ नरोनी अभ्यास तारीत जो ॥ तया० ॥ ३ ॥ जन निं-
दी तरी क्षमा शांति भारी ॥ तुटेंनि अंतरीं द्वैष ज्याच्या ॥ तया० ॥ ४ ॥ या-
तीना सांकडें ध्यालागीं कदा ॥ पाहे जो त्या सदां ब्रह्मरूप ॥ तया०
॥ ५ ॥ वर्णाश्रम धर्मीं चाले यथारीती ॥ नामरूप भ्रांती ओळखी जो ॥
तया० ॥ ६ ॥ प्रारब्धाच्या योगें महालाभ हानि ॥ होतां नोहे मनीं हर्ष-
खेद ॥ तया० ॥ ७ ॥ उंचनीच नेणे एक गुरु पूर्ण ॥ नरनारीं भिन्न दिसती-
ना ॥ तया० ॥ ८ ॥ बोलतां चालतां मोडेना समाधी ॥ वरी दृढबुद्धी गुरु
भक्ति ॥ तया० ॥ ९ ॥ हंसदास म्हणे जीवन्मुक्त जनीं ॥ हरिच्या कीर्तनीं
प्रेमभारी ॥ तयापुरु० ॥ १० ॥

## अभंग २१९.

वस्तुमात्रा परा ॥ गुरुराया परात्परा ॥ १ ॥ नामरूपाशी अतीता ॥ का-
र्य कारण अलिप्ता ॥ २ ॥ सच्चित्सुख कंदा ॥ गुरुनाथा ब्रह्मानंदा ॥ ३ ॥ सो
हं हंसा गुरुपूर्णा ॥ पिंडब्रह्मांड जीवना ॥ ४ ॥ दास म्हणे हो गुरुवरा ॥
मी नमीन तूंचि सारा ॥ ५ ॥

## अभंग २२०.

दिसेना भासेना ॥ घेऊं जातां सांपडेना ॥ १ ॥ दवडितां ते न जाय ॥ जा-
णूं जातां अंतराय ॥ २ ॥ नेणतां अवगती ॥ ऐशी जे कां वस्तुस्थिती ॥ ३
हंसदास म्हणे प्राप्त ॥ गुरुपादसेवा होत ॥ ४ ॥

## अभंग २२१.

रामकृष्णादिक अवतारी झाले ॥ शरण रिघाले सद्गुरूशी ॥ १ ॥ तेथें को-
ण पाड इतराजीवांचा ॥ म्हणोनी सर्वांचा गुरु सखा ॥ २ ॥ सद्गुरु वांचो
नी नाहीं नाहीं गति ॥ गर्जताति श्रुति बहुसाल ॥ ३ ॥ हंसदास म्हणे अ-
ज्ञानाळल्या जीवा ॥ गुरुचि विसावा सत्यसत्य ॥ ४ ॥

## अभंग २२२.

सद्गुरुशी उणा उपमे सागर ॥ सागराशी पार पहा आहे ॥ १ ॥ अगाधता तेही नाहींनाहीं पूर्ण ॥ व्यापकता जाण तेहीनाहीं ॥ २ ॥ निश्चळता म्हणां येईना कल्पांतीं ॥ निर्विकारस्थिती तेही नाहीं ॥ ३ ॥ हंसदास म्हणे किती बोलूं वाणी ॥ तुपमे अवनी सकळही ॥ ४ ॥

अभंग २२३.

देव जवळी अंतरीं ॥ पांचा कोशांचे भीतरी १ अतिगुप्त अतिगुप्त ॥ परी आहे सर्वगत ॥ २ ॥ दुग्धजळ एकभासे ॥ गुप्तप्रगटचि जैसें ॥ ३ ॥ दास म्हणे हंसावीण ॥ तेंधे निवडुन ऐसा कोण ॥ ४ ॥

अभंग २२४.

हिंगापासोनीयां सुगंध परिमळ ॥ केवीं हो मिळेल सांगाना कां ॥ १ ॥ कोळसा घांशीतां मिळेना सफेता ॥ भिकाऱ्यापें अर्था पाविजेना ॥ २ ॥ प्रकाश मिळेना कृष्णारात्रीपूनी ॥ कडूवृंदावनीं शर्करा ते ॥ ३ ॥ हंसदास म्हणे तैसेचि हे जन ॥ पावतीना ज्ञान अज्ञानापें ॥ ४ ॥

गुरुमाहात्म्याचे अभंग समाप्त.

तुकाराम कृत.

अभंग २२५.

नबोलावें परि पडिला प्रसंग ॥ हाका मारी जग तुझ्या नांवें ॥ १ ॥ लटिकेंचि सोंग मांडिसी पसारा ॥ भिकारी तूं खरा कळों आलें ॥ २ ॥ निलाजरे आह्मी करूनियां धीर ॥ राहिलों आधार धरुनी तूझा ॥ ३ ॥ कैसा तेणों आतां करिशी शेवट ॥ केली खटपट त्याचा पुढें ॥ ४ ॥ तुका म्हणे कांहीं नबोलसी देवा ॥ उगीनाहीं सेवा घेसी माझी ॥ ५ ॥

अभंग २२६.

नको सोडूं अन्न नको सेवूं वन ॥ चिंती नारायण सर्वकाळ ॥ १ ॥ मातेचिया खांदीं बाळनेणे शीण ॥ भावत्याचा भिन्न मूढाचिया ॥ २ ॥ नको रे तूं त्यागीं नको गुंतूं भोगीं ॥ लावी सर्व आंगीं देवाचिया ॥ ३ ॥ तुका म्हणे नको पुसूं वेळोवेळां ॥ उपदेश निराळा उरला नाहीं ॥ ४ ॥

तु० अ० स०.

# अथश्रीरामदासकृत स्फुट अभंग प्रारंभ.

## अभंग २२७.

कायामायाछाया हें कांहीं नगेना ॥ वैभव जगेना जन्मवरी ॥ १ ॥ जन्मवरी लोक देखत आहेती ॥ किती येती जाती सांडूनियां ॥ २ ॥ सांडूनियां जाती कन्या पुत्र धन ॥ सर्व स भिमान लौकिकाचा ॥ ३ ॥ लौकिकाचा भाव लौकिकीं राहिला ॥ प्राणिमात्र गेला एकलाचि ॥ ४ ॥ येकलाचि येतो येकलाचि जातो ॥ मध्येंचि भुलतो मायाजाळें ॥ ५ ॥ मायाजाळ माया हें कांहीं सुटेना ॥ मनाची वासना अनावर ॥ ६ ॥ अनावर मन कदा आवरेना ॥ धरितां धरेना अनुमानें ॥ ७ ॥ अनुमानें कांहीं नव्हे समाधान ॥ जंव आत्मज्ञान पाविजेना ॥ ८ ॥ पाविजेना मोक्ष तुटेना बंधन ॥ श्रवण मनन जेथें नाहीं ॥ ९ ॥ जेथें नाहीं सारासार विचारणा ॥ या जन्ममरणा तेथें ठाव ॥ १० ॥ तेथें ठाव झाला देहसमंधासी ॥ होती पापराशी अनुमानें ॥ ११ ॥ अनुमानें पाप अनुमानें पुण्य ॥ अनुमानें धन्य होईजेना ॥ १२ ॥ होईजेना धन्य विचारणें विण ॥ लौकिकाचा शीण व्यर्थ जातो ॥ १३ ॥ व्यर्थ जातो शीण देखत देखतां ॥ लौकिक तत्वता राखवेना ॥ १४ ॥ राखवेना परी राखिला पाहिजे ॥ मनामध्यें कीजे विचारणा ॥ १५ ॥ विचारणा कीजे या देवभक्तांची ॥ कर्ता कोण तोची वोळखावा ॥ १६ ॥ वोळखावा कर्ता सर्वत्र सृष्टीचा ॥ मीतो कोण कैंचा धुंडाळावें ॥ १७ ॥ धुंडाळावें महा वाक्य पंचीकरण ॥ तत्वाचें विवरण यथा सांग ॥ १८ ॥ यथासांग व्यंग पडोंचि नेदावें ॥ अलंतचि व्हावें सावधान ॥ १९ ॥ सावधान पणें देवासी पहावे ॥ नाशिवंत जावें सांडूनियां ॥ २० ॥ सांडूनियां सर्व अष्टधा प्रकृती ॥ विवेकाची गति ओळखावी ॥ २१ ॥ वोळखावी मुख्य सज्जनाची कृपा ॥ तेणें पुण्यपापा नातळावें ॥ २२ ॥ नातळावें कदा दृश्य पदार्थासी ॥ असोनि देहासी लिंपोनये ॥ २३ ॥ लिंपोनये जैसें पद्मिणीचें पत्र ॥ देहडिंभमात्र चालतसे ॥ २४ ॥ चालतसे सर्व तत्वांचें गांठोडें ॥ तेथें काय वेडें गुंडाळतें ॥ २५ ॥ गुंडाळतें वेडें देहसंबंधासी ॥ भ्रमें विवेकासी सांडूनियां ॥ २६ ॥ सांडूनियां सार घेईल असार ॥ ऐसा अनावर भ्रम आहे ॥ २७ ॥ भ्रम आहे जया अंतरीं संचला ॥ तोचितो माजला या संसारीं ॥ २८ ॥ या सं-

मारीं येक करोनियां गले ॥ येक ते बांधले संकल्यानें ॥ २९॥ संकल्यानें सुटे ऐसा कोण आहे ॥ ईश्वरासी पाहे शोधूनियां ॥ ३० ॥ शोधूनियां पाहे तोचि देव आहे ॥ येर तो नराहे देवापाशीं ॥ ३१॥ देवापाशीं राहे बहुतां सुकृतें ॥ भोगितकासी भूतें झडपिती ॥ ३२॥ झडपिती भूतें सत्यचि मानितां ॥ देवा पाहों जातां भूतें मिथ्या ॥ ३३॥ भूतें मिथ्या ऐसें हृदयीं बिंबलें ॥ तेव्हांचि जाहलें समाधान ॥ ३४॥ समाधान आहे मायातीत होतां ॥ नाथिली अहंता घेऊंनये ॥ ३५॥ घेऊंनये कदां पक्ष असत्याचा ॥ वेगीं यात्याचा पंथ धरा ॥ ३६॥ पंथ धरा जेणें परत्र पाविजे ॥ देवासि लाहिजे सन्निधानें ॥ ३७॥ सन्निधानमात्रें तरे बहुजन ॥ पावन पावन होईजेतें ॥ ३८॥ होइजे पावन तेंचितें स्वहित ॥ सोडितां पतित होईजेतें ॥ ३९॥ होईजेतें कष्टी तेंचि कां धरावें ॥ वेगीं उद्धरावें आपणासी ॥ ४०॥ आपणाशी वैर कदां करूंनये ॥ अंतीं सर्व जाय निघोनियां ॥ ४१॥ निघोनियां जाय त्यानें घेशी काय ॥ वेगीं धरी सोय शाश्वताची ॥ ४२॥ शाश्वताची सोय मांडूनी करंटा ॥ व्यर्थ बारा वाटा धांवतसे ॥ ४३॥ धांवतसे चहूं कडे अनुमानें ॥ तया समाधानें मोकलिलें ॥ ४४॥ मोकलिलें मन ऐसेंही कळेना ॥ मातला वळेना मनासंगें ॥ ४५॥ मनासंगें कदा निःसंगता नये ॥ अपाय उपाय मानीतसे ॥ ४६॥ मानितसे मनें जें जें बोळखिलें ॥ स्वरूप राहिलें मनातीत ॥ ४७॥ मनातीत होतां होय सार्थकता ॥ मनासवें जातां अधोगती ॥ ४८॥ अधोगति चुके तें कांहीं करावें ॥ मनासंगें व्हावें कासावीस ॥ ४९॥ कासावीस पंच भूतिक राहतां ॥ भूतांसि पाहतां भूतलोक ॥ ५०॥ भूतलोक वेगीं सांडोनियां जावें ॥ विचारें पावें परब्रह्म ॥ ५१॥ परब्रह्म तेंचि आपणचि आहे ॥ दास म्हणे पाहे अनुभव ॥ ५२॥

## अभंग २२८.

गणेश नमावा आणि सरस्वती ॥ मारुती गभस्ती चंद्रमौळी ॥ १॥ विष्णु खंडेराव भगवती भैरव ॥ पांडुरंगीं भावशामराज ॥ २॥ हरिदिनीं निन्हार पापाचा संहार ॥ व्रत सोमवार थोर आहे ॥ ३॥ गोमुख गोकर्ण

गोमय गोमूत्र ॥ गोशृंग पवित्र तर्पणासी ॥ ४ ॥ तुळशी काळोत्री बेल गंगावनी ॥ रुद्राक्ष विभूती पापनाशी ॥ ५ ॥ विष्णुद्वारावती तुळशीच्या माळा ॥ पाहिजे गोपाळा दहींभात ॥ ६ ॥ आषाढीं कार्तीकीं आंवळीचे वनीं ॥ घालावीं भोजनें ब्राह्मणांसी ॥ ७ ॥ ब्राह्मणांच्या तीर्थे पापक्षय होतो ॥ जन उद्धरतो विप्रवाक्यें ॥ ८ ॥ लिंगाची लाखोली लिंगा अभिषेक ॥ येणेंही विवेक पाविजेतो ॥ ९ ॥ अश्वत्थाची पूजा आणि प्रदक्षणा ॥ ध्यावा दक्षणा नारायण ॥ १० ॥ शालिग्राम पुण्य बहुतचि जोडे ॥ नर्मदे गोकडे हनुमंत ॥ ११ ॥ बाण चक्रांकित सोमसूर्यकांत ॥ तांदळे दुरित नाशिताती ॥ १२ ॥ अन्न ब्रह्म आहे विचारोनि पाहे ॥ शरीर हें राहे तयाचेनि ॥ १३ ॥ आपो नारायण सकळां जीवन ॥ कारण पर्जन्य पाहिजे तो ॥ १४ ॥ चंदनाचीं काष्ठें आणि बेलकाष्ठें ॥ थोर दंडकाष्ठें पळसाचीं ॥ १५ ॥ मृगाचें कातडें डुकराचे केश ॥ रुद्राक्ष भद्राक्ष तुळशीमाळा ॥ १६ ॥ भूमंडळीं तीर्थे तीं किती सांगावीं ॥ सर्वही फिरावीं कोणी एकें ॥ १७ ॥ अघाड्या दूर्वा कोमळ अपूर्वा ॥ तेणेंचि पूजावा लंबोदर ॥ १८ ॥ रुईमांदारांचीं फुलें कण्हेराचीं ॥ आणि जास्वंदीचीं अरगुद ॥ १९ ॥ भूमंडळावरी थोर शीतळोदकें ॥ नासती पातकें ततक्षणीं ॥ २० ॥ काऊजी भिऊजी पाठोर पिगेरे ॥ हे दगा पुजारे येक्याभावें ॥ २१ ॥ डाऊनें आनत आणि शाखा व्रत ॥ द्विदळ नेमस्त सेवूं नये ॥ २२ ॥ भोजनाचे वेळीं एकवाढी करा ॥ आणि मौन धरा स्वयें पाक ॥ २३ ॥ स्नान संध्या प्रदक्षणा नमस्कार ॥ श्राद्धपक्ष थोर सांडूं नये ॥ २४ ॥ ब्राह्मणासी वैश्वदेव उपासना ॥ करावें तर्पणा आदरेंसी ॥ २५ ॥ करावीं अलोड्य वेद आणि शास्त्रें ॥ मंत्रस्तनिस्तोत्रें नाना परी ॥ २६ ॥ तपें पुरश्चरणें ध्यानस्थ बैसावें ॥ सांग संपादावें देवतार्चन ॥ २७ ॥ धरणीं पारणीं नित्य उपोषणें ॥ तेणें होती क्षीण महादोष ॥ २८ ॥ काव्यें अभ्यासावीं पुराणें सांगावीं ॥ कवित्वें करावीं सावकाशें ॥ २९ ॥ फाल्गुन महात्में तींही संपादावीं ॥ देवतें पूजावीं विलगट ॥ ३० ॥ मांगीणी जोगीणी राहाणे गोंधळे ॥ डांकाचे कुल्लाळे जेऊं घाली ॥ ३१ ॥ बोलवावा मुंज्या नरसिंह झोटिंग ॥ पूजा करा सांग देवतांची ॥ ३२ ॥ देवतें तीं भूतें सिद्ध शिवकळा ॥ पूजावा आगळा पंचाक्षरी ॥ ३३ ॥ नानातीर्थे व्रतें सांग संपादावीं ॥

अघोरें करावीं नानाकर्मे ॥३४॥ बगाडें कुरूप राडी आणि रंडी ॥ कामना रोकडी पुरतसे ॥३५॥ गळही टोंचावे निंबही नेसावे ॥ घोडेही घालावे हातीं पायीं ॥३६॥ गुगुळ जाळावे पोतही खेळावे ॥ रोगी ते पुजावे भैरवास्त ॥३७॥ दया दान धर्म करावा संभ्रम ॥ चुकवाये कर्म संसारीचें ॥३८॥ संसारीचें कर्म तोडितां तुटेना ॥ मार्गेचि फुटेना विवेकाचा ॥३९॥ विवेकाचा मार्ग संतसंगें कळे ॥ उदंड निवळे विवेकानें ॥४०॥ भ्रष्ट शठ मुक्त विवेक सांडावा ॥ कवळी दंडावा अनाचार ॥४१॥ अनाचारें ज्ञान कदां निवळेना ॥ इहलोक कळेना परलोक ४२ परलोक माया मांडूनि पहावा ॥ अष्टधेचा गोंवा घालूंनये ॥४३॥ घालूंनये वाद वाउगा वेवाद ॥ तेणें गुणें खेद होत असे ॥४४॥ होत आहे पुढें जयाशी कल्पांत ॥ सर्व नाशिवंत सांडा मागें ॥४५॥ सांडा मागें बंड पाखांड थोतांड ॥ चिंतावा अखंड गुणातीत ॥४६॥ गुणातीत देव त्रिगुणा परता ॥ तेथें तूं सरता होई बापा ॥४७॥ बाप माय सखे कोणी कामानये ॥ धुंडावी सोय मूळाकडे ॥४८॥ मूळाकडे फळ फळाकडे मूळ ॥ मूळचि निर्मूळ भक्तियोगें ॥४९॥ भक्तियोगें ज्ञान वैराग्य पाविजे ॥ परत्र लाहिजे दास म्हणे ॥५०॥

## अभंग २२९.

अज्ञान जनाचे देव नानापरी ॥ त्यांची संख्या करी कोण आतां ॥१॥ कोण आतां देव पावेल तयांसी ॥ जन्ममरणासी चुकविता ॥२॥ चुकविता देव पाहतां दिसेना ॥ निश्चयो वसेना येकेठायीं ॥३॥ येके ठायीं देव येके ठायीं भाव ॥ चुकला उपाव सार्थकाचा ॥४॥ सार्थकाचा देव तरीच सांपडे ॥ जरी कांही घडे संतसेवा ॥५॥ संतसेवा भावें करितां तरले ॥ जन उद्धरले नेणों किती ॥६॥ नेणों किती जन साधूचे संगती ॥ आपुले प्रचिती मुक्त झाले ॥७॥ मुक्त झाले ज्ञान विचार पाहतां ॥ स्वरूपीं राहतां निरंतर ॥८॥ निरंतर देव तुटेना फुटेना ॥ चळेना ढळेना कदाकाळीं ॥९॥ कदाकाळीं देव रचेना खचेना ॥ येइना जाइना निरंजन ॥१०॥ निरंजन देव पाहतां दिसेना ॥ परि तो नासेना कल्पकोटी ॥११॥ कल्पकोटी गेले देवासी नेणतां ॥ यातना भोगितां जन्मोजन्मीं ॥१२॥ जन्मोजन्मीं देव

जवळी चुकला ॥ ाणी भांबावला मायाजाळें ॥ १३ ॥ माया जाळ कांहीं उमजत नाहीं ॥ देव गयीं गयीं कल्पनेचे ॥ १४ ॥ कल्पनेचे देव कल्पांतीं नासती ॥ ऐसें वेदश्रुती बोलतसे ॥ १५ ॥ बोलतसे श्रुती दृश्य नाशिवंत ॥ जाणिजे शाश्वत परब्रह्म ॥ १६ ॥ परब्रह्म आहे सर्वत्र व्यापक ॥ तेंचि पाहे येक गुरुमुखें ॥ १७ ॥ गुरुमुखें ब्रह्म विचार पहावा ॥ निश्चयो राहावा निर्गुणाचा ॥ १८ ॥ निर्गुणाचा ध्यास निर्गुण करील ॥ मग उद्धरील आपणासी ॥ १९ ॥ आपणाशी पाहे जो कोणी शोधुनी ॥ तो जन्मा पासूनी मुक्त झाला ॥ २० ॥ मुक्त झाला देह संबंध सांडितां ॥ निर्गुण धुंडितां निर्गुणचि ॥ २१ ॥ निर्गुणचि स्वयें संतसंगें झाला ॥ तोचि येक भला समाधानी ॥ २२ ॥ समाधानी साधू जोडतां संकट ॥ मिथ्या खटपट जेथें नाहीं ॥ २३ जेथें नाहीं माया तो माये वेगळा ॥ ऐसा तो विरळा साधुजन ॥ २४ ॥ साधुजन स्वयें तो झाला देवचि ॥ जेथें ये मायेची वार्ता नाहीं ॥ २५ ॥ वार्ता नाहीं ऐसें सज्जन जाणती ॥ अज्ञान नेणती कांहीं केल्या ॥ २६ ॥ कांहीं केल्या पापी पुण्य आचरेना ॥ संसार सरेना दुःखमूळ ॥ २७ ॥ दुःखमूळ जन्म ज्ञानें निरसावा ॥ विवेक पहावा सारासार ॥ २८ ॥ सारें निराकार असार आकार ॥ निराकार पार पाविजेतो ॥ २९ ॥ पाविजेतो परी अर्थी विवरावें ॥ विवेकें विरावें स्वस्वरूपीं ॥ ३० ॥ स्वस्वरूपीं ज्ञाने जे कोणी विराले ॥ स्वरूपचि झाले आत्मबोधें ॥ ३१ ॥ आत्मबोधें स्थिती बाणली से जया ॥ मग तया माया आतळेना ॥ ३२ ॥ आतळेना माया ममता अंतरीं ॥ नित्य निरंतरीं निरंतर ॥ ३३ ॥ निरंतर असे परि तो नदिसे ॥ गुप्त झाला भासे भासमात्रें ॥ ३४ ॥ भासमात्र देह तया ज्ञानियाचा ॥ अंतरीं सुखाचा सुखमूर्ती ॥ ३५ ॥ सुखमूर्ति सुखें दुःखाविरहीत ॥ बोलियेलों हेत कळावया ॥ ३६ ॥ कळावया हेत शब्दनिःशब्दाची ॥ लक्ष अलक्षाची सोय लागे ॥ ३७ ॥ सोयलागे तेथें लक्षना अलक्ष ॥ मी हा पूर्वपक्ष बोलियेलों ॥ ३८ ॥ बोलियेलों शब्द अनिर्वाच्य वाचे ॥ जाणती मुक्तीचे वांटेकरी ॥ ३९ ॥ वांटेकरी झाले अवस्थे वेगळे ॥ श्रुतीसी नाकळे पार ज्यां ॥ ४० ॥ पार ज्यांचा नाहीं अपार विदेही ॥ देहातीत पाहीं समाधान ॥ ४१ ॥ समाधान राहे निःसंग राहतां ॥ संग पाहों जातां कासावी-

म ॥ ४२ ॥ कासावीस झालें संगाचेनि गुणें ॥ निःसंगचि होणें सर्वकाळ
॥ ४३ ॥ सर्वकाळ संग सोडावा आपुला ॥ मीपणाच्या बोला लागोंन
ये ॥ ४४ ॥ लागोंनये कदां मनामागें मागें ॥ कल्पनेच्या स्यागें समाधा
न ॥ ४५ ॥ समाधान राहे संतांचे संगती ॥ वस्तूची प्रचीती वस्तुरूप ॥ ४६
॥ वस्तरूप झाला जो कोण्ही साधक ॥ धन्य तोचि एक लोकमध्यें ॥ ४७
॥ लोकामध्यें परलोकचि साधावा ॥ भगवंत शोधावा नाना परी ॥ ४८ ॥
नानापरी संग रामीं रामदास ॥ भाविक विश्वास मोडूनये ॥ ४९ ॥

## अभंग २३०.

संसार करितां होय सायुज्यता ॥ ऐसें कांहीं आतां सांगा स्वामी ॥ १ ॥ सां
गा स्वामी कोण स्थिती जनकाची ॥ राज्य करितांचि मुक्त कैसा ॥ २ ॥ मुक्त कै
सा होता देहींच विदेही ॥ कैसा लिप्त नाहीं करोनीयां ॥ ३ ॥ करोनियां सर्व
आपण वेगळा ॥ सांगतेचि कळा आह्मा लागीं ॥ ४ ॥ आह्मा लागीं सांगा
त्याचें समाधान ॥ रामदासा खुण पुसतसे ॥ ५ ॥ पुसतसे आतां पाहिजे
बोलिलें ॥ कैसें राज्य केलें विदेहानें ॥ ६ ॥ विदेहानें सत्य स्वामीचें वचन ॥ ते
थें विश्वासोन वर्ततसे ॥ ७ ॥ वर्ततसे जनीं अहंता सांडूनी ॥ अनादि कार-
णीं प्रकृतिहे ॥ ८ ॥ प्रकृतीचा प्रांत आदिमध्य अंत ॥ तेंचि तें निवांत रू
प तुझें ॥ ९ ॥ रूप तुझें सदा सर्वत्र संचलें ॥ वेदाचेनि बोलें महावाक्य ॥-
१० ॥ महावाक्य तें तूं स्वरूप आहेसी ॥ जाण निश्चयेंसी आपणासी ॥ ११
आपणासी पाहतां झाली तन्मयता ॥ सोहं हें तत्वता मनीं धरी ॥ १२ ॥ म
नीं धरी सोहं आत्मा हें वचन ॥ तेणें समाधान पावशील ॥ १३ ॥ पावशी
ल निजस्वरूप आपुलें ॥ जरी विश्वासलें मन तेथें ॥ १४ ॥ मन तेथें जाय
पवना सरिसें ॥ तंव मनीं नसे मनपण ॥ १५ ॥ मनपण गेलें स्वरूपीं पाहतां
तैसेंचि राहतां समाधान ॥ १६ ॥ समाधान बाणे त्यागितां संगासी ॥ ज
नकें शुकासी सांगीतलें ॥ १७ ॥ सांगीतलें संगत्यागा स्वरवी भव ॥ म
अनुभव शुक पाहे ॥ १८ ॥ शुक पाहे संग काय स्या धरिला ॥ विव रूं
गला स्वस्वरूपीं ॥ १९ ॥ स्वस्वरूपीं शुक नावरूप नाहीं ॥ जनक विदेही
आदळेना ॥ २० ॥ आदळेना तुटी तेथें कैंची भेटी ॥ आठवण पोटीं रू
पाची ॥ २१ ॥ स्वरूप आठवी आपुला विसर ॥ शुक योगीश्वर बोलतां

२२॥ संगातीत झा ला निःसंग पाहतां॥ तेणेंरीती आतां समाधान ॥२३॥ समाधान बाणे र ज्जन संगती॥ तीन्हीही प्रचीती ऐक्यरूप॥ २४॥ ऐक्य रूप वेदस्वामीचें चन॥ आपुलेंही मन सत्य मानी॥२५॥ सत्य मानी ब्र ह्म येर सर्व भ्रम॥ अहंतेची सीमा बोलांडीली॥२६॥ बोलांडिली सीमा देह संबंधाची॥ झालें असत्यचि स्वप्न जैसें॥२७॥ स्वप्न जैसें मानी जागृती आठव॥ पैरतनें जाणावें मिथ्याभूत॥२८॥ मिथ्याभूत माया सद्गुरुवचनें॥ देहप्रारब्धानें वर्ततसे॥२९॥ वर्ततसे परी देह तूं नव्हेसी॥ विश्वास मानसीं दृढ धरी॥३०॥ दृढ धरी अहंब्रह्म ऐसी खूण॥ देहाचें कारण प्रकृतीच॥३१॥ प्रकृतीचें रूप तें नव्हे स्वरूप॥ पुण्य आणि पाप देहसंगें॥३२॥ देहसंगें बाधा निःसंगासी कैंचा॥ वृत्ति निवृत्तीचा शून्याकार॥३३॥ शून्याकार देह काईसा संदेहो॥ वृत्ति शून्य पाहो संत जन॥३४॥ संत जन जेणें सुखें सुखावले॥ तेंचि हें बोलीलें ओंवी मिसें॥३५॥ ओंवी मिसें गुप्त पंथ हा सांपडे॥ गुज ठायीं पडे योगियांचें॥३६॥ योगीयांचें गुज योगीच जाणती॥ जेथें नेतिनेती वेद बोले॥३७॥ वेद बोलियेला त्रिविध वचन॥ कर्मउपासना आणि ज्ञान॥३८॥ ज्ञानाचा निश्चय बोलिला वेदांतीं॥ आणि शास्त्रमतीं बहुसाल॥३९॥ बहुसाल शास्त्र पाहतां सरेना॥ आयुष्य पुरेना जन्मवरी॥४०॥ जन्मवरी वायां संदेहीं पडावें॥ केधवां पडावें समाधान॥ ४१॥ समाधान घडे साधूचे संगतीं॥ गीता भागवतीं हेंचि आहे॥ ४२॥ हेंचि आहे सार जाणावें साचार॥ करावा विचार शाश्वताचा॥ ४३॥ शाश्वताचा भाव सर्व ठायीं पडे॥ जरीं भावें घडे साधुसंग॥ ४४॥ साधुसंगें देव पाविजे तत्वता॥ शास्त्रें धांडोळितां आढळेना॥ ४५॥ आढळेना जनीं दिसेना लोचनीं॥ तेंया साधूचेनी पाविजेतें॥ ४६॥ पाविजे तें निजस्वरूप आपुलें॥ मन मावलें जिये ठायीं॥ ४७॥ जियेठायीं तूटे सर्वही आशंका॥ तेंचि लाभे एका साधुसंगें॥ ४८॥ साधुसंग सत्य मानावा अंतरीं॥ वेगीं सोय धरी आलयारे॥ ४९॥ आलयारे संग साधूचा धरावा॥ संसार तरावा साधुसंगें॥ ५०॥ साधुसंगें ज्ञान रामदासीं झालें॥ शरीर लागलें भक्तिसंगें॥ ५१॥

## अभंग २३१.

पहिलें प्रथम मूळीं परब्रह्म ॥ व्यापक सूक्ष्म जेथें तथें ॥ १ ॥ जेथें तेथें व स्तु आहे निराकार ॥ शब्द व्योमाकार प्रगटित ॥ २ ॥ प्रगटित असे दिसे नाना भासें ॥ विचारें विलसे ज्ञानियासी ॥ ३ ॥ ज्ञानियासी ज्ञानें कळे निरंजन ॥ आणि जन वन सारिखेंचि ॥ ४ ॥ सारिखेंचि आहे देव ओळखतां ॥ जेथें तेथें जातां देवभासे ॥ ५ ॥ देव भासे मनीं नित्य निरंतर ॥ बाह्य अभ्यंतर व्यापूनियां ॥ ६ ॥ व्यापूनियां आहे सर्वांचे अंतरीं ॥ अनुभवें हरि ओळखावा ॥ ७ ॥ ओळखावा परि ओळखतां नये ॥ म्हणोनि उपाय साधुसंग ॥ ८ ॥ साधुसंग धरी श्रवणें विवरी ॥ सारासार करी विचारणा ॥ ९ ॥ विचारणा करी देवा निर्गुणाची ॥ आणि सगुणाची उपासना ॥ १० ॥ उपासना कर्म हें आधीं पाळावें ॥ मग सांभाळावें ब्रह्मज्ञान ॥ ११ ॥ ब्रह्मज्ञान नसे तेज न आंधळें ॥ सन्मार्गीं पांगुळे क्रियाभ्रष्ट ॥ १२ ॥ क्रियाभ्रष्ट कर्म उपासनेंवीण ॥ नेणतां निर्गुण सर्व मिथ्या ॥ १३ ॥ सर्व मिथ्या जंव ब्रह्मज्ञान नाहीं ॥ क्रिया कर्म कांहीं सोडवीना ॥ १४ ॥ सोडवीना कर्म याकर्मा पासूनी ॥ भगवंतावांचूनी नारांबळी ॥ १५ ॥ नारांबळी झाली देवासि नेणतां ॥ कर्मीं गुंडाळतां देव कैंचा ॥ १६ ॥ देव कैंचा भेटे कर्में ऊर फुटे ॥ संशयचि वाटे सर्वकाळ ॥ १७ ॥ सर्व काळ गेला संदेहीं पडतां ॥ नित्य चोरवाळितां कलेवर ॥ १८ ॥ कलेवर काया नित्य धूत गेला ॥ लावितो कोणाला उपकार ॥ १९ ॥ उपकार कैंचा सेवक देवाचा ॥ आणि कुटुंबाचा भारवाही ॥ २० ॥ भारवाही झाला देवासी चुकला ॥ लौकिकचि केला जन्मवरी ॥ २१ ॥ जन्मवरी केलें अंतीं व्यर्थ गेलें ॥ कासावीस झालें वायांवीण ॥ २२ ॥ वायांवीण काळ गेला कीं निर्फळ ॥ कर्म हें सबळ सुटेनाकीं ॥ २३ ॥ सुटेना कीं कर्म कोण सोडवीता ॥ सांडूनी अनंता कर्म केलें ॥ २४ ॥ कर्म केलें देह चालतां निर्मळ ॥ खंगतां वोंगळ देह झाला ॥ २५ ॥ देह झाला क्षीण सदा हागवण ॥ मृत्तिकेचा शीण कोण करी ॥ २६ ॥ कोण करी तेव्हां कर्माचें पाळण ॥ झाली भणभण शरीराची ॥ २७ ॥ शरीराची जेव्हां झाली भणभण ॥ तेव्हां नारायण भजों पाहे ॥ २८ ॥ भजों पाहे तेव्हां नारायण कैंचा ॥ गेला अभाग्याचा व्यर्थ काळ ॥ २९ ॥ व्य-

काळ गेला देवा न भजतां ॥ देह चोरवाळितां चोरवाळेना ॥ ३० ॥ चोरवाळे ना देहे बाढवी संदेहे ॥ अंतकाळीं पाहे दैन्यवाणा ॥ ३१ ॥ दैन्यवाणा पाहे देवा न भजतां ॥ तेव्हां तुला आतां कोण सोडी ॥ ३२ ॥ कोण सोडी देव धुंडाळिल्या वांचूनी ॥ ह्मणोनी भजनीं सावधान ॥ ३३ ॥ सावधानपणें देवासि शोधावें ॥ तेणेंचि साधावे परलोक ॥ ३४ ॥ परलोक साधे संताचे संगती ॥ चुके अधोगती गर्भवास ॥ ३५ ॥ गर्भवास चुके ज्ञान अभ्यासितां ॥ वस्तूची पाहतां वस्तूरूप ॥ ३६ ॥ वस्तुरूप होणें विवेकाच्या गुणें ॥ नित्यविवरणें सारासार ॥ ३७ ॥ सारासारें घडे असाराचा त्याग ॥ योगियां निःसंग सहजची ॥ ३८ ॥ सहजचि कर्मा पासुनि सुटला ॥ बोधें विनटला परब्रह्मीं ॥ ३९ ॥ परब्रह्मीं हेतू लागतां अहंतू ॥ देहीं देहातीतू रामदास ॥ ४० ॥

## अभंग २३२ (नवविधा भक्ति)

देव निराकार त्या नाहीं आकार ॥ आकार संहार होत आहे ॥ १ ॥ होत आहे जें जें तें सर्व जाणार ॥ जाणार होणार सर्व माया ॥ २ ॥ सर्व माया दिसे हें पंचभूतिक ॥ आत्मा आहे एक निरंजन ॥ ३ ॥ निरंजनीं जनवन कांहीं नसे ॥ दृश्यभास भासे कल्पनेसी ॥ ४ ॥ कल्पनेसी भासे तें सर्व कल्पित कल्पनेरहित परब्रह्म ॥ ५ ॥ परब्रह्म नाहीं ऐसा ठाव कैंचा ॥ धन्य तो देवाचा आत्मज्ञानी ॥ ६ ॥ आत्मज्ञानी नर पाहे सारासार ॥ पुढें तदाकार होत आहे ॥ ७ ॥ होत आहे जन्म सार्थक तयाचा ॥ जेथें सज्जनाचा अनुग्रह ॥ ८ ॥ अनुग्रह घडे बहुतां सुकृतें ॥ साक्षात्कार जेथें रोकडाची ॥ ९ ॥ रोकडाची मोक्ष साधूचे संगती ॥ चुके अधोगती आत्मज्ञानें ॥ १० ॥ आत्मज्ञानें होत आत्मनिवेदन ॥ भक्तीचें लक्षण नवविधा ॥ ११ ॥ नवविधाभक्ती श्रवण करावी ॥ धारणा धरावी श्रवणाची ॥ १२ ॥ श्रवणाची स्थिती ब्रह्मनिरूपणें ॥ श्रवण मननें निदिध्यास ॥ १३ ॥ निदिध्यास मनीं वस्तूचा धरावा ॥ विचार करावा आपुलाही ॥ १४ ॥ आपुलाही ठाव ज्ञानें होतो वाव ॥ जाणीजे उपाव श्रवणाचा ॥ १५ ॥ श्रवणाचा भाव जाणतें ज्ञाण ॥ तिन्हीही प्रतीती ऐक्य रूप ॥ १६ ॥ ऐक्यरूप देव भक्त नामांकित ॥ नंतअनंत जैसा तैसा ॥ १७ ऐसा आहे लाभ श्रवण भक्तीचा ॥ जेथें विकीचा ठाव नाहीं ॥ १८ ॥ ठाव नाहीं ऐसें श्रवणें जाणावें ॥ कीर्तन करा-

वें हेंचि जाणां ॥ १९ ॥ हेंचि हें कीर्तन नित्य निरंतर ॥ ग्रंथाचें अंतर विवरावें ॥ २० ॥ विवरावें जेणें तोचि तो जाहाला ॥ रंक तो पावला राज्यपद ॥ २१ ॥ पदांपद प्राप्त झालें संतसंगें ॥ सद्य अंतरंगें समाधान ॥ २२ ॥ समाधान झालें श्रवणें कीर्तनें रामाच्या स्मरणें चित्तशुद्धी ॥ २३ ॥ चित्तशुद्धी झाली तेणें हें धरावें ॥ सेवन करावें सद्गुरूचें ॥ २४ ॥ सद्गुरू करावे तें पादसेवन ॥ सद्गुरूनें ज्ञान होत आहे ॥ २५ ॥ होत आहे ज्ञान सद्गुरु करितां ॥ होय सार्थकता गुरूचेनी ॥ २६ ॥ गुरूचेनी परलोक ठायीं पडे ॥ सार तें निवडे प्रत्ययेंसी ॥ २७ ॥ प्रत्ययेंसी बोलतेंचि तें बोलणें। अर्चन करणें गुरु देवा ॥ २८ ॥ गुरु देवा लागीं कीजे नमस्कार ॥ साहावी साचार भक्ती ऐसी ॥ २९ सर्व दास्य कीजे ते भक्ती सातवी ॥ सख्य ते आठवी भक्ती जाण ॥ ३० ॥ नवमीचें लक्षण आत्मनिवेदन ॥ सर्वदा अभिन्न परब्रह्मीं ॥ ३१ ॥ परब्रह्मच्यें आपणचि होणें ॥ ऐशींहीं लक्षणें सार्थकाचीं ॥ ३२ ॥ सार्थक भजन आत्मनिवेदनें ॥ विवेकें अभिन्न देव भक्त ॥ ३३ ॥ देव भक्त कैसे हें आधीं पहावें ॥ स्थीतीनें राहावें सर्व काळ ॥ ३४ ॥ सर्वकाळ वस्तु आहे जैशी तैशी ॥ देहप्रारब्धासी समर्पिला ॥ ३५ ॥ समर्पिला त्यासि होणार होईल ॥ जाणार जाईल पंचभूत ॥ ३६ पंचभूत माया मायीक दिसते ॥ होतें आणि जातें स्वप्नाकार ॥ ३७ ॥ स्वप्नाकार माया आपण वेगळा ॥ असोनि निराळा सर्वां मध्यें ॥ ३८ ॥ सर्वां मध्यें आहे परी सर्व साहे ॥ आहे तैसें आहे सदोदित ॥ ३९ ॥ सदोदित वस्तु तेचि ते आपण ॥ रामदास खूण सांगतसे ॥ ४० ॥

## अभंग २३३.

सप्रचीत बोली मिथ्या कोण करी ॥ धन्य जो वीवरी विवेकानें १ ॥ विवेकाचें ज्ञान भेटतां संकट ॥ ज्यासि स्वटपट सुखरूप ॥ २ ॥ सुखरूप संत सत्य साभिमानी ॥ तयासीच मानी येरां नाहीं ॥ ३ ॥ येरां नाहीं गती सत्यावांचोनीयां ॥ असत्याच्या पायां कोण पडे ॥ ४ ॥ कोण पडे जाणा संदेहाचे डोहीं ॥ कोणावीण नाहीं चाड आह्मां ॥ ५ ॥ आह्मां नाहीं चाड ते कोणा एकाची ॥ हद राघवाची कांस धरूं ॥ ६ ॥ कांस धरूं ज्ञेणें पावनचि केलें ॥ उं माझें झालें समाधान ॥ ७ ॥ समाधान झालें प्रत्ययासि आलें ॥ धन्य ते

ऊलें राघोबाचीं ॥ राघोबाचीं पदें मानसीं धरीन ॥ विश्व उद्धरीन हेळामा-
त्रें ॥ ९ ॥ हेळा मात्रें मुक्त करीन हे जन ॥ नरीच पावन राघोबाचा ॥ १० ॥ रा
घोबाचा दास मी झालों पावन ॥ पतीत तो कोण ऊरों शके ॥ ११ ॥ उरों शके ऐ
सें कल्पांतीं घडेना ॥ जो कोणी पुसेना त्यासी ऊणें ॥ १२ ॥ उणें नसे गातां मा
झ्या सूर्यवंशा ॥ काणाची दुराशा नाहीं आह्मां ॥ १३ ॥ नाहीं आह्मां उणें रा-
घोबाच्या गुणें ॥ ब्रीद हें राखणें पावनाचें ॥ १४ ॥ पावनाचें ब्रीद आह्मां प्रा
प्त झालें ॥ प्रचितीस आलें किती एकां ॥ १५ ॥ किती एक जन ज्ञानें उद्धरिले
कृतकृत्य झाले तात्काळची ॥ १६ ॥ तात्काळचि मोक्ष हें ब्रीद रामाचें ॥ होत
असे साचें येणें काळें ॥ १७ ॥ येणें काळें मोक्ष जनां मी देईना ॥ दास ह्मण-
वीना राघोबाचा ॥ १८ ॥ राघोबाचा वर पावलों सत्वर ॥ जनांचा उद्धार क-
रावया ॥ १९ ॥ कराया समर्थ राम सूर्य वंशीं ॥ मज्ञ कामयासी रागें जतां
॥ २० ॥ रागें जतां राग येईल समर्था ॥ हे तो कांहीं सत्ता माझी नव्हे ॥ २१ ॥
माझी सर्व सत्ता जानकी जीवना ॥ आतां मी लेखींना ब्रह्मादिकां ॥ २२ ॥ ब्र-
ह्मादिकां माय जानकी पासूनी ॥ तयासी व्यापूनी राम आहे ॥ २३ ॥ राम आ-
हे जनीं राम आहे वनीं ॥ राम निरंजनीं सारिखाची ॥ २४ ॥ सारिखाचि रा
म दृष्टी पाहूं जातां ॥ तोचि पाहा आतां निरंतर ॥ २५ ॥ निरंतर कांहो राम अं-
तरतां ॥ सांडूनियां जातां एकीकडे ॥ २६ ॥ एकीकडे जातां तेथें माझा राम
सांडूनीयां भ्रम बरें पहा ॥ २७ ॥ बरें पाहा तुह्मीं आतांच पावाल ॥ पावन
चि व्हाल रामरूप ॥ २८ ॥ राम रूपें सर्व रूपें निवारिलीं ॥ असतचि झालीं
नाहीं जैशीं ॥ २९ ॥ नाहीं रूप जैसें भिंती चित्राकार ॥ तैसा हा आकार स्व-
प्नजैसें ॥ ३० ॥ स्वप्नींचा आकार कल्पनेसी भासे ॥ रामरूप असे निर्विक
ल्प ॥ ३१ ॥ निर्विकल्प राम कल्पितां होईजे ॥ मिळोनि जाईजे राम रूपीं ॥
॥ ३२ ॥ राम रूपीं सर्व समाधान झालें ॥ पावनचि केलें पावनानें ॥ ३३ ॥ पा
वन हा राम जो कोणी पावेल ॥ रामचि होईल निजध्यासें ॥ ३४ ॥ निदिध्या-
स निज वस्तूचा धरावा ॥ श्रवण करावा साक्षात्कार ॥ ३५ ॥ साक्षात्कार हो
य नित्य निर्गुणाचा ॥ मग त्या गुणाचा पार नाहीं ॥ ३६ ॥ पार नाहीं ऐसें ने-
णोनि जाणीजे ॥ शीघ्रचि पाविजे या संसारीं ॥ ३७ ॥ या संसारीं सुखें संसा
र करितां ॥ सर्वही भोगितां भोगातीत ॥ ३८ ॥ भोगातीत जैसा श्रीकृष्णा

दुर्वासा ॥ आत्मज्ञानी तैसा सर्व काळ ॥ ३९ ॥ सर्व काळ देहीं असतां विदेही रामदासीं नाहीं जन्म मृत्य ॥ ४० ॥

## अभंग २३४

सर्वांगीं सुंदर कांसे पीतांबर ॥ विद्येचा सागर वंदीयेला ॥ १ ॥ वंदियेली मनीं सरस्वती माता ॥ सद्गुरु समर्था दंडवत ॥ २ ॥ दंडवत माझें संतसज्जनांसीं ॥ भाविक जनांसी आलिंगन ॥ ३ ॥ आलिंगनें माझें निवालें सर्वांग ॥ भाविकांचा संग देई देवा ॥ ४ ॥ देई देवा तूझें नाम अहर्निशीं ॥ आठवी मानसीं रूप तुझें ॥ ५ ॥ तुझाचि आधार मज अनाथासी ॥ ह्मणीआऋंगशी माय बापा ॥ ६ ॥ माय बाप बंधू सज्जन सांगाती ॥ तूंचि आदिअंतीं माहीयेर ॥ ७ ॥ माहीयेर माझें पुण्य परायण ॥ योगियां मंडणस्वामी माझा ॥ ८ ॥ स्वामी माझा राम अंतरला दूरी ॥ प्रस्तावा अंतरीं वारतसे ॥ ९ ॥ वारतसे रवंती सर्व काळ चित्तीं ॥ केव्हां कृपा मूर्ति भेटईल ॥ १० ॥ भेटईल केव्हां राम माझी माता ॥ जीव हा दुश्चिता सर्व काळ ॥ ११ ॥ सर्व काळ माझे मनीं आठवण ॥ युगाच्या समान क्षण जातो ॥ १२ ॥ जातसेहे वय वेचोनियां माझें ॥ रूप रामा तूझें दिसे नाकीं ॥ १३ ॥ दिसे नाकीं रूप सांवळें स्कंदर ॥ कांसे पीतांबर काशीयेला ॥ १४ ॥ काशियेली अंगीं चंदनाची उटी ॥ मुक्त माळा कंठीं डोल देती ॥ १५ ॥ डोलताति माळा पदकीं रत्नकीळा ॥ मृगनाभी टिळा रेखियेला ॥ १६ ॥ रेखियेला भाळीं स्कगंध परिमळ ॥ लोधले अळिकूळ झंकारती ॥ १७ ॥ झंकारतीवास घेती सावकाश रामराजाधीशा शोभतसे ॥ १८ ॥ शोभतसे माथा मुगुट झळाळ ॥ किरीट तेजाळ रम्य शोभा ॥ १९ ॥ रम्य निमासूर श्रीमुख साजिरें ॥ दिव्य मकराकारें तळपती ॥ २० ॥ तळपती कुंडलें बाव्ह बाहुवरे ॥ दोर्दंड गोमटे चापबाणें ॥ २१ ॥ चापबाण करीं नवरत्न भूषणें ॥ तीं वीर कंकणें कीर्तीमुखें ॥ २२ ॥ मुखें मुरडूनीसिंह जाती वनीं ॥ जघन देखोनि संकोचिले ॥ २३ ॥ संकोचले दैत्य पुनळे तोडरीं ॥ गर्जती नेपुरीं अंदू वांकी ॥ २४ अंदू वांकी पायीं आणि वीरासन ॥ माझे मनीं ध्यान आठवलें ॥ २५ ॥ आठवला ध्यानीं रामचंद्र चित्तीं ॥ सन्मुख मारुती उभा असे ॥ २६ ॥ उभा असे सर्व बंधूंचा समुदाव ॥ त्रिकूटाचा राव बिभीषण ॥ २७ ॥ बिभीषण

णि किष्किंधेचा राव ॥ सर्व समुदाव वान्नरांचा ॥२८॥ वान्नरांसहीत राम राजाधीश ॥ आनंद जनांस थोर झाला ॥२९॥ झाला यशवंत राम सूर्यवंशीं ॥ रामीं राम दासी भेटी झाली ॥३०॥

## अभंग २३५.

बहू काळ गेले देवासी धुंडितां ॥ देव पाहों जातां जवळीच ॥१॥ जवळीच आहे पाहातां न दीसे ॥ सन्निधचि असे रात्रंदीस ॥२॥ रात्रंदीस देव सबाह्य अंतरीं ॥ जिवां क्षणभरी विसंबेना ॥३॥ विसंबेना परी जीव हे नेणती ॥ जाती अधोगती ह्मणोनीयां ॥४॥ ह्मणोनियां सदा सावध असावें ॥ विन्मुख नसावें राघवासी ॥५॥ राम पूर्व पुण्यें झालिया सन्मुख ॥ मग तो विन्मुख होऊं नेणें ॥६॥ होउ नेणें राम सर्वांग सुंदर ॥ नित्यनिरंतर मागें पुढें ॥७॥ मागें पुढें सन्मुखचि चहूं कडे ॥ फीटी होती वाडराघवाची ॥८॥ राघवाचि भेटी झाल्या नाही तूटी ॥ मग कल्पकोटी-चिरंजीवी ॥९॥ चिरंजीवी होय राघवीं मिळतां ॥ तेथें पाहों जातां मृत्यू नाहीं ॥१०॥ नाहीं जन्म मृत्यू नाहीं येणें जाणें ॥ स्वरूपीं राहाणें सर्व काळ ॥११॥ सर्वकाळ मन तदाकार होय ॥ जरी राहे सोय श्रवणाची ॥१२॥ श्रवणाची सोय संताचेनि संगें ॥ विचारेंचि भंगे अहंभाव ॥१३॥ अहंभावें राम भेटला न जाय ॥ जवळीच होय दूरी कैसा ॥१४॥ दुरी होय कैसा अहंभाव करी ॥ जवळीच चोरी आपणासी ॥१५॥ आपणासि चोरी सबाह्य अंतरीं ॥ आणि सृष्टीभरी नांदतसे ॥१६॥ नांदतसे अंत नाहीं तो अनंत ॥ जाणतील संत अनुभवीं ॥१७॥ अनुभवीं जाणे येथींची ही खूण ॥ येरां विटंबण वाटईल ॥१८॥ वाटईल सुख संत सज्जनांसी रामीं रामदासीं भेटी झाली ॥१९॥

## अभंग २३६.

माझें थोरपण वेद वाखाणिती ॥ ऐशी हे प्रचीती सिद्ध आतां ॥१॥ सिद्ध आतां बोध देखत देखतां ॥ होय सार्थकता शीघ्र काळें ॥२॥ शीघ्र काळें-काळ सर्व संहारिला ॥ अनुभव आला रोकडाची ॥३॥ रोकडाचि आतां-तुह्मीं तरी पहा ॥ विवेकानें आहा काय नेणों ॥४॥ नेणों महिमान विवेकी जनांचें ॥ होय सज्जनांचें मूळस्थान ॥५॥ मूळस्थानें मूळ होईजे

केवळ॥ कोणर्गे चांडाळ मिथ्या बोले ॥ ६॥ मिथ्या बोलवेना पहा विवंच
ना॥ सिद्ध विवंचना केसें येतें ॥ ७॥ केसें येतें आत्म प्रचीती आपण॥
मी तूं ऐसें कोण सांग बापा ॥ ८॥ सांग बापा मनीं बरें विचारूनी ॥ न
त्याची झाडणी.करूनियां ॥ ९॥ करूनियां पंचीकर्णविवरण ॥ पुढें मी·
तूं पण कोठें आहे ॥ १०॥ आहे तैसें आहे प्रत्ययें जाणावें ॥ बोणासी ह्म-
णावें काय आतां ॥ ११ ॥ काय आतां होतें बहु बोलोनियां ॥ घेतलें सेज्या
या सर्व कांहीं ॥ १२॥ सर्व कांहीं दृश्य असे जाई जयें ॥ माझा मीच जा-
णें कोणा सांगें॥ १३॥ कोणा सांगों आतां हें कोण घेईल॥ वायांचि ज्ञा
ईल अभिमानें॥ अभिमानें सत्य राम कोपताहे ॥ सिद्धचि न लाहे आ
त्मरूप ॥ १५ ॥ आत्मरूप स्वयें आपण नव्हीजे॥ तरी वायां कीजे राम
दास्य॥ १६॥ रामदास्य आणि हें वांयां जाईल॥ ऐसें न घडेल कदाका
ळीं ॥ १७॥ कदाकाळीं राम दासा उपेक्षीना॥ राम उपासना ऐशी आहे
॥ १८॥ ऐशी आहे सार राघोबाची भक्ती॥ विभक्तीची भक्ती जेथें नाहीं
॥ १९॥ जेथें नाहीं कांहीं वाउगें मायीक॥ राम उपासक दास ह्मणे॥ २०॥

## अभंग २३७.

जें पंचभूतीक तें सर्व मायीक॥ बोलती विवेक संत जन॥ १॥ संत जनींस
र्व मायीक ह्मणावें॥ तरी कां फिरावें तीर्थाटन॥ २॥ तीर्थाटणें देव मायीका
चे पोटीं॥ तरी आटाआटी कां करावी॥ ३॥ कां करावी पूजा सांडूनि पर-
मात्मा॥ मूर्खस्य प्रतिमा हें वचन॥ ४॥ हें वचन मिथ्या केसें हो करावें
काय हो धरावें आतां आह्मीं॥ ५॥ आतां आह्मीं वाक्य मिथ्या ह्मणों
नये॥ देवधर्म काय मोकलावा॥ ६॥ मोकलावा देव ऐसें ह्मणों नये ॥
तरी वाक्य काय मिथ्या आहे॥ ७॥ मिथ्या नव्हे वाक्य मिथ्या नव्हे देव
पडिला संदेह काय कीजे॥ ८॥ कीजे दृढ भाव सगुण देवासी॥ जंव क-
ल्पनेसी उरी आहे॥ ९॥ कल्पनेचें रूप विवेकें विरालें॥ मग सर्व झालें
गंगाजळ॥ १०॥ गंगाजळ झालें निर्विकल्पें केलें॥ सगूण राहिलें सह
जची॥ ११ ॥ सहजचि कीजे उपाधीन कीजे॥ एकांतीं बोलीजे गुरु गम्य
॥ १२॥ गुरुगम्य आहे कल्पने वेगळें॥ कल्पनेच्या मुळें वाद उठे॥ १३॥ वा
द उठे जनीं ऐसें न करावें॥ त्रिकांड जाणावें वेदवाक्य॥ १४॥ वेदवाक्य

बोले कर्म उपासना ॥ अंतीं शब्द ज्ञाना बोलियेलें ॥ १५ ॥ बोलियेलापूर्व पक्षतो सिद्धांत ॥ केला निश्चितार्थ संत जनीं ॥ १६ ॥ संतजनीं दृढविश्वास असावा ॥ मग विसरावा संदेह तो ॥ १७ ॥ संदेह धरी ते कल्पना आपुली ॥ निर्विकल्प केली साधु जनीं ॥ १८ ॥ साधु जनीं केला निश्चयो धरावा ॥ तेथें अहं भावा उरी नाहीं ॥ १९ ॥ उरी नाहीं संत संगें संदेहासी ॥ रामीं रामदासीं निःसंदेह ॥ २० ॥

## अभंग २३८. (वाद.)

ब्रह्म हें निर्गुण मुळीं निराकार ॥ तेथें चराचर कैसें झालें ॥ १ ॥ झालें निराकारीं अहंता स्फूरण ॥ एकीएकपणें प्रगटलें ॥ २ ॥ प्रगटलें कैसें आकार नसतां ॥ निर्गुणीं अहंता कोणें केली ॥ ३ ॥ कोणी केली नाहीं सर्वही मायीक ॥ निर्गुण तें एक जैसें तैसें ॥ ४ ॥ जैसें तैसें सर्व मायीक रचलें ॥ निराकारीं झालें कोणे परी ॥ ५ ॥ परी हे नाथिली साच मानूं नये नाहीं त्यासी काय पुसशील ॥ ६ ॥ पुसशील काय वांझेच्या लेंकरा ॥ मृगजळपूरा भांबावसी ॥ ७ ॥ भांबावसी काय मुळाकडे पाही ॥ मुळीं तेथें कांहीं झालें नाहीं ॥ ८ ॥ नाहीं कां ह्मणतां प्रत्यक्ष दिसतें ॥ सत्यत्वें भासतें चराचर ॥ ९ ॥ चराचर सत्य हें कई घडेल ॥ अंधारीं बुडेल रवीबिंब ॥ १० ॥ बिंबला हे मनीं दिसतें लोचनीं ॥ तें कैसें वचनीं मिथ्या होय ॥ ११ ॥ मिथ्या होय स्वप्न जागृती आलीया ॥ तेंचि निजलीया सत्य वाटे ॥ १२ ॥ सत्य वाटे मिथ्या मिथ्या वाटे सत्य ॥ ऐसें आहे कृत्य अविद्येचें ॥ १३ ॥ अविद्येचें कृत्य तुह्मींच सांगतां ॥ मागुती ह्मणतां झाली नाहीं ॥ १४ नाहीं झालें कांहीं दृश्यांचें बंधन ॥ तैसें हें अज्ञान बाधीनसे ॥ बाधीनसे परी सर्वही नाथीलें ॥ कांहीं नाहीं झालें ज्ञानी यासी ॥ १६ ॥ ज्ञानियासि दृश्य दिसत कां नाहीं ॥ देहींच विदेही कैसा झाला ॥ १७ ॥ ज्ञाला विदेही तो देहींच असतां ॥ दिसतें पाहतां परि मिथ्या ॥ १८ ॥ मिथ्या हें सकळ मज कां वाटेना ॥ संशय तूटेना अंतरींचा ॥ १९ ॥ अंतरींचा संशय तुटे संतसंगें ॥ कृपेचेनि योगें दास ह्मणे ॥ २० ॥ श्रीराम ॥

## अभंग २३९.

नानारंग शरवीं होनातिवो रंग ॥ सर्वदा सुरंग राम रंग ॥ १ ॥ रामरंग कदा

काळीं घो रंगेना॥ तेथें राहे मना रंगोनीयां॥२॥ रंगोनियां राहे तद्रूप होऊनी॥ मग जनीं वनीं समाधान॥३॥ समाधान घडे राघवीं मिळतां॥ मग दुर्मिळता कदां नाहीं॥४॥ कदां नाहीं खेद सर्वदा आनंद॥ सुखाचा संवाद संत संगें॥५॥ संतसंगें जन्म सार्थक जाहला॥ राम सांपडला जवळीच॥६॥ जवळीच राम असोनि चूकले॥ थोर भांबावले मायीकासी॥७॥ मायीकासी प्राणी सत्यचि मानिती॥ सत्य तें नेणती जाणपणें॥८॥ जाणपणें मनीं अज्ञान धारलें॥ तेंचि विस्तारलें ज्ञानरूपें॥९॥ ज्ञानरूप भ्रांती सामावली चित्तीं॥ संशय निवृत्ति नव्हे तेणें॥१०॥ नव्हे तेणें रूप ठाउकें रामाचें॥ जें कां विश्रामाचें माहीयेर॥११॥ माहीयेरें घडे संशय निवृत्ति॥ राम सीतापतीचेनि नामें॥१२॥ रामनामें रूपसर्वही निरसे॥ जो कोणी विश्वासे रामनामीं॥१३॥ रामनामीं चित्त ठेऊनि असावें॥ दुश्चित नसावें सर्व काळ॥१४॥ सर्व काळ गेला सार्थकीं जयाचा॥ धन्य तो देवाचा दास ह्मणे॥१५॥

## अभंग २४०. (वाद.)

साकाराचें सुख निराकारा नये॥ निराकारीं काय पाहाशील॥१॥ पहा सुख दुःख सुखामागें दुःख॥ शोक अवश्यक अंगीं वाजे॥२॥ अंगीं वाजे शोक येरवाद्दियेवेळे॥ सुख सर्व काळ सगुणाचें॥३॥ सगुणाचें सुख नासोनि जाईल॥ सगुण होईल नाहीं ऐसें॥४॥ नाहीं ऐसें एक निर्गुण दिसतें॥ रोकडेंचि तेथें कांहीं नाहीं॥५॥ कांहीं नाहीं कैसें आहे घनदाट॥ सर्वांचा शेवट परब्रह्म॥६॥ परब्रह्म परी परी पाहातां दिसेना॥ नये अनुमाना कांहीं केल्या॥७॥ कांहीं एक नव्हे पाषाणाचें सोनें, तैसें हें अज्ञानें जाणिजेना॥८॥ जाणिजेना जंव निज परब्रह्म॥ तंव कैसा भ्रम जाऊं पाहे॥९॥ जाऊं पाहे मन ब्रह्मासि पाहाया॥ तंव तेथें माया दिसताहे॥१०॥ दिसताहे माया तया निरूप्यासी येरवीं मायेसी ठाव कैंचा॥११॥ कैंचा ठाव माया तया ज्ञानियासी॥ रामीं रामदासीं संतसंग॥१२॥

## अभंग २४१. (वाद.)

द्वय हें काशाचें कोणें उभारिलें॥ मज निरोपिलें पाहिजे हें॥१॥ पाही

ज्ञेहें दृश्यभूतपंच काचें॥ उभारिलें साचें माया देवी॥ २॥ माया देवी कोण कैसी ओळखावी॥ आणि हे त्यागावी कोणें परी॥ ३॥ परी हें मायेचें मिथ्या ओळखावें॥ ज्ञाणें नित्यागावें ज्ञान बोधें॥ ४॥ ज्ञान बोधें माया जाणोनि त्या गिली॥ परी नाहीं गेली काय कीजे॥ ५॥ कीजे निरूपण संतांचे संगती॥ तेणें शुद्धमती होत असे ६॥ होत असे परी तैसीच असेना॥ निश्चय वसेना मनामध्यें॥ ७॥ मनामध्यें सदा विवेक धरावा॥ निश्चयो करावा येणें रीती॥ ८ रीती नीविवेकाची पाहतां घडीची॥ ज्ञान से सर्वेचि निघोनियां॥ ९॥ निघोनियां जाय विवेक अथवा॥ तो संगत्याग वा साधकानें॥ १०॥ साधकानें संग कोणाचा त्यागावा॥ सदृढ धरावा कोण संग॥ ११॥ संग हा आदरें धरी सज्जनाचा॥ त्यागी दुर्जनाचा दास ह्मणे॥ १२॥

## अभंग २४२.

आपुल्या भजना पोर ही पुरेना॥ लागे उपार्जना दुसऱ्याची॥ १॥ दुसऱ्याची सेवा करितां वेतन॥ पाविज्ञतें अन्न लोकांमध्यें॥ २॥ लोकांमध्यें उपासितां द्रव्य दारा॥ मागावा मुशारा कोणापाशीं॥ ३॥ कोणापाशीं कोणें काय हो सांगावें॥ कैसेनि मागावें वेतनासी॥ ४॥ वेतनासि ज्ञानें नरिच पाविजे॥ जरी सेवा कीजे स्वामीयाची॥ ५॥ स्वामियाचि सेवा करितां उत्पन्न॥ स्वामी सुप्रसन्न होत असे॥ ६॥ होत असे देव संतुष्ट भजनां॥ मुक्ति सायुज्य तानेणें लाभे॥ ७॥ लाभे नवविधा तेणें चतुर्विधा॥ पुसावें सुबुद्धा सज्जनांसी॥ ॥ ८॥ सज्जनांसी पुसा देहासी भजतां॥ भार भगवंता कैसा पडे॥ ९॥ कैसा पडे भार देहाच्या भजनें॥ भक्तीचे निर्गुणें देव पावे॥ देव पावतसे भजनां देवासी॥ सेवितां देहासि देव कैंचा॥ ११॥ देव कैंचा देह शोधिल्या वांचूनी॥ तत्वें विवंचूनी दास ह्मणे॥ १२॥

## अभंग २४३.

आतां चिया देहीं मुक्ति पाविजेना॥ तरी कां सज्जना शरण जावें॥ १॥ शरण जातां भावें सज्जन चि व्हावें॥ शीघ्र उद्धरावें निरूपणें॥ २॥ निरूपणें निजवस्तु तेसां पडे॥ गूज गर्यी पडे अकस्मात्॥ ३॥ अकस्मात ठावना देखे आपुला॥ निरंजनीं झाला निरंजन॥ ४॥ निरंजन झाला याज्ञनीं असोनी उन्मनी गिन्मनी नाढळती॥ ५॥ नाढळनी जेथें कांहीं देहभाव॥ नलज्ञा-

नेंवावदेहबुद्धि ॥ ६ ॥ देहबुद्धिगेलीदेखतदेखतां ॥ मीकोणहें आतांसां- पडेना ॥ ७ ॥ सांपडेनाशऋद्धीमीपणपाहातां ॥ तेंमीपणजातांवस्तुरूप ॥ ॥ ८ ॥ वस्तुरूपबोधेंअरूपहोईजे ॥ विवेकाचीकीजेविचारणा ॥ ९ ॥ विचा- रणाझालीरामीरामदासीं ॥ आतांयाजन्मासीठावनाहीं ॥ १० ॥ ठावना- हींऐसेंराघवाचेंदेणें ॥ थोराहूनिहोणेंथोरस्वयें ॥ ११ ॥

## अभंग २४४.

जाणेसुखदुःखराम माझाएक ॥ येरतेमायीकवैभवाचे ॥ १ ॥ वैभवा- चींसर्वांवारंगोनीजानी ॥ आत्माराम अंतींजीवलग ॥ २ ॥ जिवलगना- हींश्रीरामावांचूनी ॥ हाचिमाझेमनीं द्रढभाव ॥ ३ ॥ भावअन्यत्राचाआ- हंवरपंगाचा ॥ रामेंवीणकेंचाअंतरंग ॥ ४ ॥ अंतरींचीव्यथाश्रीरामस- मर्था ॥ जाणवल्यांचिंतादूरकरी ॥ ५ ॥ करींप्रतिपाळशरणआलियाचा रामत्रैलोक्याचामायबाप ॥ ६ ॥ मायबापबंधूसज्जनसोयरा ॥ येक्या रघूवीरावीणनाहीं ॥ ७ ॥ नाहींमजकोणीश्रीरामअसतां ॥ सत्वरवाह- तांउडीघाली ॥ ८ ॥ उडीघालीमजअनाथाकारणें ॥ रामसर्वजाणेअंत रींचें ॥ ९ ॥ अंतरींचेंगुजरामसर्वबीज ॥ रामदासींनिजप्रगटलें ॥ १० ॥

## अभंग २४५.

मायीकाचीभक्तीउधाराचीमुक्ति ॥ तेंशीनाहींस्थितीराघवाची ॥ १ ॥ राघवाचीकृपासद्यमोक्षफळ ॥ तुटेतळमळचमत्कार ॥ २ ॥ चमत्कार आतांजोकोणीपाहेना ॥ त्याचापंथउणाकोटिगुणें ॥ ३ ॥ कोटिगुणें उणेंजिणेंत्यानराचें ॥ जेथेंविचाराचेंवोसघर ॥ ४ ॥ वोसघरींकोण- कासयासीधांवे ॥ व्यर्थचिशिणावेंकामेंवीण ॥ ५ ॥ कामेंवीणकामराहे आत्माराम ॥ तेथेंचिविश्रामपाविजेतो ॥ ६ ॥ पाविजेलपरीविवरतजावें सर्वहीसांडावेंओळखोनी ॥ ७ ॥ ओळखतांत्यागसर्वांचाघडेल ॥ मार्गसांपडेलयोगियांचा ॥ ८ ॥ योगियांचापंथयोगीचजाणती ॥ ति- न्हीहीप्रचीतीएकतेथें ॥ ९ ॥ एकजेथेंआत्मशास्त्रगुरुवाक्य ॥ पाहेम- हावाक्यविवरोनी ॥ १० ॥ विवरोनीब्रह्मीब्रह्मअहमस्मी ॥ रामआहेरा मीरामदासीं ॥ ११ ॥

## अभंग २४६

रामराम आतां कष्ट झाले थोर ॥ पुरे हा संसार मागुतेनी ॥ १ ॥ रामासि साजणें हेंचि आतां भलें ॥ सुहृदीं विटलें मन माझें ॥ २ ॥ सुहृदांचा झाला नकरी सन्माना ॥ स्वाध्यायी महापुरुषा आत्मयारामा ॥ ३ ॥ परस्त्रीच्यासंकेतें गणिका राम बोले ॥ तिशीं रामें नेलें माहियेरा ॥ ४ ॥ माहेरस्या केलें श्रीराम अभंग ॥ सुहृदांचा पांग नाहीं आतां ॥ ५ ॥ आतां काय मज सुहृद वासना ॥ ध्यायीं सनातना राघवासी ॥ ६ ॥ ध्यायीन वो माय आतां रामपाय ॥ मज काय होय प्रपंचें हा ॥ ७ ॥ प्रपंचासंगतीं पाविजे दुःखातें ॥ सांगतचि होते संत तरी ॥ ८ ॥ तरी अव्हेरिलें सुखातें मानिलें ॥ अंगीं आदळलें तेंचि शोरवी ॥ ९ ॥ शोरवीं जिवलग राम मनीं धरूं ॥ मी कां ऐसें करूं अनहीत त्यांचा ॥ १० ॥ हिताहित कांहीं न धरी मी मनीं ॥ असई-नजनीं जनातीत ॥ ११ ॥ तीन सुखदुःखा रामानंद झाले ॥ मुक्त से हो-ऊनि सर्वसंगीं ॥ १२ ॥ नित्यमुक्त असे रामदास स्वामी ॥ देहडिंभ कामीं वर्ततसे ॥ १३ ॥

## अभंग २४७.

दृष्टेंवीण छाया गुणेंवीण माया ॥ बिंबेंवीण माया प्रतिबिंब ॥ १ ॥ प्रतिबिंब सरी सिंधूवीण लहरी ॥ सोनेंवीण परी अळंकार ॥ २ ॥ अळंकार कृत्य कर्त्यावीण केवीं ॥ तंवीं गाथ्यागोंवी निर्गुणासी ॥ ३ ॥ निर्गुणासि गूण हेंचि मूर्खपण ॥ दृश्यावीण खूण दृष्टांताची ॥ ४ ॥ दृष्टांताचि खूण परब्रह्मीं घडे ॥ वेदां मौन्य पडे कासयासी ॥ ५ ॥ कासयासि तेथें अद्वैत पहावें ॥ द्वैताचें स्वभावें ब्रह्म झालें ॥ ६ ॥ झालें परब्रह्म अत्यंत सुगम ॥ ब्रह्म आणि भ्रम येकरूप ॥ ७ ॥ येकरूप आहे दूध आणि ताक ॥ हंस आणि काक बोलताती ॥ ८ ॥ बोलताति सर्व ब्रह्म ऐसें बंड ॥ सर्व हीं याता(?)डसंत जाणे ॥ ९ ॥ संत जाणे ब्रह्म निर्मळ निश्चळ ॥ मायेचा विटाळ तेथें नाहीं. १० ॥ जेथें नाहीं गूण त्या नांव निर्गुण ॥ गुरुमुखें खूण ठायीं पडे ॥ ११ ॥ ठायीं पडे सत्य शाश्वत स्वरूप ॥ मग आपेंआप बुझशील ॥ १२ बुझशील साच धरितां विश्वास ॥ रामीं रामदास सांगतसे ॥ १३ ॥ ७ ॥

## अभंग २४८.

गोंवीचे निमिसें देव आठवावा ॥ हृदयीं धरावा सर्वकाळ ॥ १ ॥ सर्वका-

ळमनींस्वरूपाचाछंदु॥तेणेंभवसिंधूतुटईल॥तुटईलव्याधीयाज-न्मकर्मांची॥जरीराघवाचीभक्तिघडे॥३॥भक्तीघडेभावेंसगुण-देवाची॥संगतीदेहाचीजंवआहे.॥४॥आहेदेहजंवसगुणींभजावें स्वस्वरूपव्हावेंआपणाची॥५॥आपणचिदेवआपणचिभक्त॥संत संगेंमुक्तआपणाची॥६॥आपणचिसर्वआपणचिवाव॥आपणाचा ठावआपणाची॥७॥आपणतूंपणजंवतें अंतरीं॥तंवभक्तीकरीसगु-णाची॥८॥सगुणाचीभक्तीलोभाचीविरक्ती॥निर्गुणाचीमुक्तिसा-योज्यता॥९॥सायोज्यतामुक्तिफिटलासंदेहो॥बंधनचीवावोराम-दासीं॥१०॥

## अभंग २४९

क्षणयेकरामआठवितांचित्तीं॥तेणेंउद्धरतीकोटीकुळें॥१॥कोटि-कुळंघातपाहतीतयाची॥आवडीजयाचीरामनामीं॥२॥रामनामें तुटेकुळाचेंबंधन॥पुत्रतोनिधानहरिभक्त॥३॥हरीभक्तयेकजाहला प्रऱ्हाद॥जयाचागोविंदकयवारी॥४॥कईवारीहरीराखेनानापरी ऐसाभावधरीआलयारे॥५॥आलयारेहोतविचारीआपुलें॥सर्व-हीनाथीलेंमायाजाळ॥६॥मायाजाळदिसेदृष्टीचेंबंधनें॥जाण तीसज्जनअनुभवी॥७॥अनुभवींसंतसज्जनदेखसी॥तेथेंरा-घवासीठायींपाडी॥८॥ठायींपाडीरामजीवींचाविश्राम॥जेणें-सर्वकामतृप्तहोती॥९॥तृप्तहोतीमाझेमनिंचमनोरथ॥राघवा चास्वार्थमनींधरी॥१०॥मनींधरीसर्वदेवांचाकैवारी॥ध्यातसेअंत-रींमहादेव॥११॥महादेवसर्वजनांउपदेशी॥रामींरामदासींदृढ भाव॥१२॥ छ॥

## अभंग २५०

विप्रवासिलाजेथेंकेलासींचाराव॥तेथेंयेकभावदृढधरा॥१॥दृढ धराभाववाल्मीकाचेपरी॥सर्वऋषेश्वरींजाणीजेतें॥२॥जाणी वाल्मीकऋषीरामायण॥तारिलेपाषाणरामनामें॥३॥रामना तंवउद्धरे गणिका॥नेलीदिव्यलोकायाचदेहीं॥४॥याचदेहींग तीपावालकुंटीणी॥रामनामवाणीउच्चारितां॥५॥उच्चा

महोयपूर्णकाम ॥ संसारींचाश्रमदूरजाय ॥ ६ ॥ दूरीश्रमजायआनं-
दमानसीं ॥ रामींरामदासींहृदभाव ॥ ७ ॥

## अभंग २५१.

अंतींपंचभूतेंभूतासिमिळालीं ॥ वासनाराहिलीकोण्यागायीं ॥ १ ॥
कोण्यागायींतेव्हां वासनाहेराहे ॥ रूपकैसेंआहेवासनेचें ॥ २ ॥ वास-
नेचेंरूपसूक्ष्मजाणावें ॥ संकल्पस्वभावेंरूपतिचें ॥ ३ ॥ रूपतिचेंअं-
तकाळींकोठेंराहे ॥ अनुभवेंपाहेआपुलीया ॥ ४ ॥ आपुलासंकल्प
जयावस्तुवरी ॥ तेथेंवस्तीकरीवासनाहे ॥ ५ ॥ वासनाहेवस्तीकरी
अगोदर ॥ मगकलेवरसचेतन ॥ ६ ॥ सचेतनकायाकारणींलावावी
॥ वासनागोंवावीरामरूपीं ॥ ७ ॥ रामरूपींसत्यसंकल्पधरावा ॥ सं-
सारतरावाअवलीळा ॥ ८ ॥ अवलीळाभवसागरवोसरे ॥ जरीमनीं
धरेगुरुवाक्य ॥ ९ ॥ गुरुवाक्येंगतीरामदासींझाली ॥ संगतीजोड-
लीराघोबाची ॥ १० ॥

## अभंग २५२.

ओकितांहेंमनबरेंकंटाळलें ॥ राखेनेंझांकिलेंसावकाश ॥ १ ॥ साव-
काशतयाकोणअभिलाषी ॥ कोणालाअसोशीकासयाची ॥ २ ॥ का
सयाचीआतांवासनाधरावी ॥ गोडीविवरावीविषयाची ॥ ३ ॥ विष-
याचीगोडीकंटाळलेंमन ॥ नागवलेजनअसोशीचे ॥ ४ ॥ असोशीचे
जनतेजन्मघेतील ॥ जेचित्तदेतीलविषयासी ॥ ५ ॥ विषयासिवीटे
मनापासूनियां ॥ तयासियातनाजन्मनाहीं ॥ ६ ॥ जन्मनाहींऐसेंके-
लेंदेवरायें ॥ वासनाउपायेंसोडविली ॥ ७ ॥ सोडविलेंदेवेंधन्यदयानि
धी ॥ तुटलीउपाधीसर्वकाहीं ॥ ८ ॥ सर्वकाहींनाहींहेंमजप्रमाण ॥ दास
म्हणेरवूणदेवजाणे ॥ ९ ॥

## अभंग २५३.

शिसाचियेपरीव्हावेंएकचित्त ॥ ध्यानींभगवंतसोडूंनये ॥ १ ॥ सोडूं
येसर्वकाळनिदिध्यास ॥ श्रवणअभ्यासअसोंद्यावा ॥ २ ॥ असों
वासदासन्निधविवेक ॥ तेणेंदेवएकचोजवेल ॥ ३ ॥ चोजवेलदेव
पैरमननें ॥ कुबुद्धिसाधनेंपालटावी ॥ ४ ॥ पालटावीसर्वदेहाचीअ

हंता ॥ शोधावीतत्वता देहबुद्धी ॥ ५ ॥ देहबुद्धीसर्वज्ञानेंशोधूंजातां ॥ निःसंगअनंताभेटीहोय ॥ ६ ॥ भेटीहोयज्ञानेंनिर्गुणदेवाची ॥ मगना हींचीचीसंसारींची ॥ ७ ॥ संसारींचीचीचीयातनायमाची ॥ चुकवील-तोचिधन्यएक ॥ ८ ॥ धन्यएकजनींतोचितोपाहतां ॥ मुक्तीसायुज्य ताजयालाभे ॥ ९ ॥ जयालाभेमुक्तीसगुणाचीभक्ती ॥ दासह्मणेशक्ती आगळातो ॥ १० ॥

## अभंग २५४.

नमनलंबोदराशारदासुंदरा ॥ सद्गुरुमाहेरासंतजनां ॥ १ ॥ संतांचे संगतीनिःसंगहोईजे ॥ स्वरूपपाविजेआपुलेंची ॥ २ ॥ आपुलेंस्व-रूपआपणानेणवे ॥ तयासिजाणवेरामकेवी ॥ ३ ॥ रामकेवीकळेना कळेचेदासी ॥ संगेंतयापाशींपाविजेना ॥ ४ ॥ पाविजेनाजंवहादे-हसंबंधू ॥ राघवाचाबोधूदेहातीत ॥ ५ ॥ देहातीतसंततोजाणा अनंत ॥ प्रकृतीचाअंतनिजानंद ॥ ६ ॥ निजानंदपूर्वपक्षाचेंबोल णें ॥ सिद्धांतासिऊणेंआणियेल ॥ ७ ॥ आणियेलउणेंशब्दसमु-द्रासी ॥ निःशब्दतेग्रासीमौनमुद्रा ॥ ८ ॥ मौनमुद्राध्यानआसनस माधी ॥ अविद्याउपाधीमावळली ॥ ९ ॥ मावळलीसर्वदासाचीआ शंका ॥ जानकीनायकादेखतांची ॥ १० ॥

## अभंग २५५.

प्रथमनमनसाधूसंतजन ॥ जयाआत्मज्ञानप्रांजळीत ॥ १ ॥ प्रां-जळीतज्ञानआत्मनिवेदन ॥ हेंचिसमाधानयोगियांचें ॥ २ ॥ यो-गियांचेंगुजनेणेचिसर्वबीज ॥ एकचिसहजआदिअंतीं ॥ ३ ॥ आदि अंतींसदानिर्मळनिश्चळ ॥ जेंसेंतेंकेवळचिदाकाश ॥ ४ ॥ चिदाका शबाह्यअंतरींकोंदलें ॥ तेसेंतेंएकलेंस्वस्वरूप ॥ ५ ॥ स्वस्वरूपींमि-थ्यामायातेंपडळ ॥ जेसेंतेंअभाळनाथिलेंचि ॥ ६ ॥ नाथिलेंचिदिसे साचाचियेपरी ॥ जैशीबाजीगरीसत्यवाटे ॥ ७ ॥ सत्यवाटेस्वप्नजेरे निजेलिया ॥ तेंचितेंविलयामिथ्याभूत ॥ ८ ॥ मिथ्याभूतमायासान् तांईश्वर ॥ श्रोतींहाविचारविवरावा ॥ ९ ॥ विवरावाऐसेंरामदासह्म णे ॥ सद्गुरुवचनेंचोजवेल ॥ १० ॥

## अभंग २५६.

प्रथमनमनसंतसाधूजना ॥ संवादाचेंज्ञानबोलावया ॥ १ ॥ बोलावया सारवस्तूचाविचार ॥ जेणेंनिरंतरसुखवाटे ॥ २ ॥ सुखवाटे- मनींसंवादसज्जनीं ॥ तेणेंध्यानींमनींस्वस्वरूप ॥ ३ ॥ स्वस्वरूपम नेंकदाआकळेना ॥ सुलभसज्जनाचेनिसंगें ॥ ४ ॥ संगेंसाधूंचि- यासमाधानझालें ॥ स्वरूपलाधलेंरामदासीं ॥ ५ ॥

## अभंग २५७.

आमुचेसज्जनसाधूसंतजन ॥ होयसमाधानतयाचेनी ॥ १ ॥ त- याचेनिसंगेंपाविजेविश्रांती ॥ साधूआदिअंतींसारिखेचि ॥ २ ॥ सारिखेचिसदासंतसमाधानी ॥ ह्मणोनियांमनींआवडती ॥ ३ ॥ आवडतीसदासंतजिवलग ॥ सुखरूपसंगसज्जनांचा ॥ ४ ॥ सज्जनांचासंगपापानेंसंहारी ॥ ह्मणोनियांधरीरामदास ॥ ५ ॥

## अभंग २५८.

सत्यरामयेरसर्वहीमायीक ॥ जाणहाविवेकयोगियांचा ॥ १ ॥ योगियांचादेवतयानाहींखेव ॥ जेथेंजीवशीवऐक्यरूप ॥ २ ॥ ऐक्यरूपजेथेंहेंपिंडब्रह्मांड ॥ तेंब्रह्मअखंडनिराकार ॥ ३ ॥ निरा- कारब्रह्मबोलतातिश्रुती ॥ आदिमध्यअंतींसारिखेंचि ॥ ४ ॥ सारि खेंचिब्रह्मनभाचियेपरी ॥ बाह्यअभ्यंतरींकोंदलेंसें ॥ ५ ॥ कोंदलें सेपरीपाहतांदिसेना ॥ साधूवीणयेनाअनुभवा ॥ ६ ॥ अनुभवा येतांतेंब्रह्मनिश्चळ ॥ जायतळमळसंसारींची ॥ ७ ॥ संसारींचेंदुः खसर्वहीविसरे ॥ जरीमनींभरेस्वस्वरूप ॥ ८ ॥ स्वस्वरूपींना हींसुखआणिदुःख ॥ धन्यहाविवेकजयापाशीं ॥ ९ ॥ जयापा शींज्ञानपूर्णसमाधान ॥ त्यांचीआठवणदासकरी ॥ १० ॥

## अभंग २५९.

ज्ञानाचेंलक्षणक्रियासंरक्षण ॥ वरीविशेषणरामनाम ॥ १ ॥ रा- मनामवाचेविवेकअंतरीं ॥ अनुतापवरीत्यागावया ॥ २ ॥ त्यागा वयाभोगबाह्यलोलंगता ॥ पाहीजेतत्वतांअनुताप ॥ ३ ॥ अनु तापेंत्यागबाह्याकारेंझाला ॥ विवेकानेंकेलाअंतरींचा ॥ ४ ॥ अंत-

रींचात्यागविवेकेंकरावा ॥ बाहेरीधरावाअनुताप ॥ ५ ॥ अनुताप मर्नाविवेकवैराग्य ॥ घडेत्याचेंभाग्यकायसांगों ॥ ६ ॥ कायसांगोंभाग्य अचळचळेना ॥ महिमाकळेनाब्रह्मादिकां ॥ ७ ॥ ब्रह्मादिकांलाभ ज्ञानाचादुर्लभ ॥ नोहोयसुलभसाधुसंगें ॥ ८ ॥ साधुसंगेंसाधूहोईजे आपण ॥ सांगतसेखूणरामदास ॥ ९ ॥

## अभंग २६०

नामघेतांरामरूपठायींपडे ॥ गूजतेंसांपडेयोगियांचें ॥ १ ॥ योगीयांचेंगूजसर्वांठायींअसे ॥ परीतेंनदिसेज्ञानेंवीण ॥ २ ॥ ज्ञानेंवीणयोगज्ञानेंवीणयाग ॥ ज्ञानेंवीणत्यागवाउगाची ॥ ३ ॥ वाउगाचिधर्मवाउगेंचिकर्म ॥ गर्मगीतावर्मबोलियेली ॥ ४ ॥ बोलियेलीवर्मज्ञानहेंसार्थक ॥ येरनिरर्थकसर्वधर्म ॥ ५ ॥ सर्वधर्मत्यागीमजशरणयेयी ॥ अष्टादशाध्यायींबोलियेलें ॥ ६ ॥ बोलीयेलेंज्ञानआगमींनिगमीं ॥ ज्ञानेंवीणऊर्मीनिरसेना ॥ ७ ॥ निरसेनाऊर्मीआत्मज्ञानेंवीण ॥ ज्ञानाचेंलक्षणनिरूपण ॥ ८ ॥ निरूपणेंज्ञानअंतरींप्रकाशे ॥ विवेकेंनिरसेमायाजाळ ॥ ९ ॥ मायाजाळींजनआत्मज्ञानीझाले ॥ दासह्मणेगेलेसुटोनियां ॥ १० ॥

## अभंग २६१.

जंवआहेतुजहादेहसंबंध ॥ तंवनव्हेबोधराघवाचा ॥ १ ॥ राघवाचाबोधयादेहावेगळा ॥ देहकळवळातेथेंनाहीं ॥ २ ॥ नाहींसुखदुःखनाहींयेणेंजाणें ॥ चिरंजीवहोणेंरामरूपीं ॥ ३ ॥ रामरूपींहोयजन्ममृत्युवाव ॥ विश्रांतीचाठावरामएक ॥ ४ ॥ रामएकरूपींसर्वरूपीं आहे ॥ अनुभवेंपाहेआपुलीया ॥ ५ ॥ आपुल्याअंतरींबाह्यनिरंतरीं ॥ सर्वसृष्टीभरीनांदतसे ॥ ६ ॥ नांदतसेसदाजवळीकळेना ॥ कदाआकळेनासाधूवीण ॥ ७ ॥ साधूवीणरामधांडोळितांश्रम ॥ नव्हेचिविश्रामसाधूवीण ॥ ८ ॥ साधूवीणरामकदाआकळेना ॥ संदेहतुटेनाकांहींकेल्या ॥ ९ ॥ कांहींकेल्यानव्हेसाधूसंतांवीण ॥ रामदासखूणसांगतसे ॥ १० ॥

## अभंग २६२.

[illegible]नियमी ॥ अलस्यासीलसीऐसानाहीं ॥ १ ॥

नाहींकोणीऐसा देवाचापारखी॥आपुलेंओळखीठायींपाडी॥२॥ठायीं पाडीनिजस्वरूपआपुलें॥असोनिचोरिलेंजवळीच॥३॥जवळीना दूरीपाताळींनावरी॥सबाह्यअंतरींकोंदाटलें॥४॥कोंदाटलेंअसेपरी तेंनदिसे॥जवळीचकेसेंआटळेना॥५॥आटळेनाअंगींअसोनिस वांगीं॥जयालागीयोगीधुंडिताति॥६॥धुंडितातिकडीकपारींशि-खरीं॥समागमेंहरीचोजवेना॥७॥चोजवेनाएक्यासद्गुरूवांचोनी॥पाहिजेहामनींदृढनिश्चय॥८॥निश्चयपाहिजेदृढस्वरूपाचा॥ति हीप्रचीतीचाऐक्यभावें॥९॥ऐक्यभावेंभेटीरामदासींमुक्ति॥तया-सिविभक्तीदूरीठेली॥१०॥

## अभंग २६३.

निर्मळनिश्चळस्वरूपकेवळ॥द्वैततळमळजेथेंनाहीं॥१॥जेथेंनाहीं कायानाहींमोहमाया॥रंकआणिराया सारिखेंचि॥२॥सारिखेंचि-सदासर्वदास्वरूप॥तेंचितुझेंरूपजाणबापा॥३॥जाणबापास्वयेंतूंचि आपणासी॥सोहंस्मरणासीविसरतां॥४॥विसरतांसोहंस्मरणआपु लें॥मगगुंडाळिलेंमायाजाळीं॥५॥मायाजाळींतुझातूंचिगुंतलासी॥ यातनाभोगिशीह्मणोनियां॥६॥ह्मणोनियांहोईसावधअंतरीं॥सोहंदृ-ढधरीदासह्मणे॥७॥

## अभंग २६४.

प्रगटनागुप्तव्यक्तनाअव्यक्त॥आदिमध्यअंतसारिखेंचि॥१॥सारिखें चिवाटेदेहजेथेंआटे॥दुजेपणतुटेएकलेंसी॥२॥एकींएकपणेंउजे-डासिआलें॥तेणेंगुणेंगेलेंदुजेपण॥३॥एकदोनतीनपांचपंचवीस॥ खेळेसाधकाशामायादेवी॥४॥मायाहेमायीकसबळवाटेनया॥आ त्मज्ञानजयाप्राप्तनाहीं॥५॥नाहींओळखिलेंआपआपणासी॥मा-याअज्ञानासीवेढालावी॥६॥वेढालावियेलेंमायेनेंजीवांसी॥आ-त्मजीवत्वासींआलानाहीं॥७॥आलेगेलेमेलेआपणाकळलें॥यातीं-तराहिलेंआपरूप॥८॥रूपअनुभवितांनाहींज्ञेयज्ञाता॥अनुभ-वनत्वनातोहीनुरे॥९॥रामींरामदासरामरूपींवीरे॥पाहेराहीनु-रेजोजोदिल्हा॥१०॥

## अभंग २६५.

अनंताचा अंत पाहावयागेलों ॥ तेणें विसरलों आपणासी ॥ १ ॥ आपणा आपण पाहतां दिसेना ॥ रूपगवसेना दोहीं कडे ॥ २ ॥ दोहींकडे देव आपणचि आहे ॥ संग हा न साहे माझा मज ॥ ३ ॥ माझा मज भार जाहला बहूत ॥ देखतां देखत कळों आलें ॥ ४ ॥ कळों आला भार देखतां विचार ॥ पुढें सारासार विचारणा ॥ ५ ॥ विचारणा झाली रामीं रामदासीं ॥ सर्व हा संगासीं मुक्त केलें ॥ ६ ॥ मुक्त केलें मोक्षा मुक्तीची उपेक्षा ॥ तुटली अपेक्षा कोणी एक ॥ ७ ॥

## अभंग २६६.

कल्पनेचा प्रांत तो माझा एकांत ॥ तेथें मी निवांत बैसईन ॥ १ ॥ बैसईन सुखरूप क्षण एक ॥ पाहों न विवेक राघवाचा ॥ २ ॥ राघवाचा पार अनंत अपार ॥ नाहीं पारावार स्वरूपासी ॥ ३ ॥ स्वरूप रामाचें अत्यंत कोमळ ॥ जेथें नाहीं मळ मायीकाचा ॥ ४ ॥ मायीकाचा मळ जाय तत्क्षणीं ॥ रामदर्शनीं दास ह्मणे ॥ ५ ॥

## अभंग २६७.

स्वरूपाची भेटी तेथें नाहीं तुटी ॥ वायांचि हिंपुटी होत असे ॥ १ ॥ होतसे हिंपुटी नसतां वियोग । असतां संयोग सर्वकाळ ॥ २ ॥ सर्वकाळ ऐक्यरूप आलिंगन ॥ तेथें मी तूं पण हारपलें ॥ ३ ॥ हारपलें दुःख द्वैताचें पाहतां ॥ सुखरूप आतां समाधान ॥ ४ ॥ समाधान चळे ऐसें न करावें ॥ विवेकें भरावें स्वस्वरूपीं ॥ ५ ॥ स्वस्वरूपीं नाहीं संयोग वियोग ॥ सर्वकाळ योग सज्जनांचा ॥ ६ ॥ सर्वकाळ योग सज्जनांचा आहे ॥ विचारूनि पाहें अनुभवें ॥ ७ ॥ अनुभवीं झाली तुह्मां आह्मां भेटी ॥ आतां न व्हे तूटी दास ह्मणे ॥ ८ ॥

## अभंग २६८.

तुह्मां अह्मां मुळीं झाली नाहीं तूटी ॥ तूटीवीण भेटी इच्छितसा ॥ १ ॥ इच्छितसा योग नसतां वियोग ॥ तुह्मां आह्मां योग सर्वकाळ ॥ २ ॥ सर्वकाळ तुह्मी आह्मी एके स्थळीं ॥ वांयां मृगजळीं बुडों नका ॥ ३ ॥ बुडों नका ऊतां सावध असावें ॥ रूप ओळखावें जवळीच ॥ ४ ॥ जवळीच आहे नक

धरूंदूरी ॥ बाह्य अभ्यंतरींअसोनियां ॥ ५ ॥ असोनि सन्निधवियोगाचा खेद ॥ नसोनियांभेद लाऊं नये ॥ ६ ॥ लाऊंनयेभेद मायीकसंबंधी ॥ रामदास बोधींभेटीझाली ॥ ७ ॥

## अभंग २६९.

जेथेंजावेंतेथेंराम समागमें ॥ आतांकासयामीखंतीकरूं ॥ १ ॥ खंतीकरूंज्याचीतोसमागमेंचि ॥ पाहतांसुखाचीघडीहोय ॥ २ ॥ होयदेव खराभूमंडळवासी ॥ जातांदिगंतासीसारिखाची ॥ ३ ॥ सारिखाचि जनींवनींवनांतरीं ॥ तोगिरीकंदरींसारिखाचि ॥ ४ ॥ सारिखाचिकडींकपाटींपाहतां ॥ रामआठवितांरामदासीं ॥ ५ ॥

## अभंग २७०.

रामाचेंभजनतेंचिमाझेंज्ञान ॥ तेणेंसमाधानपावेनमी ॥ १ ॥ रामासि वर्णितांदेहींविदेहता ॥ झाली तन्मयतासहजचि ॥ २ ॥ राघवाचेंरूपतें माझेंस्वरूप ॥ तेणेंसुखरूपनिरंतर ॥ ३ ॥ रामदासह्मणेयेणेंभजगती ॥ रामसीतापतीचेनीनामें ॥ ४ ॥

## अभंग २७१.

पूर्णसमाधानइंद्रियदमन ॥ श्रवणमनननिरंतर ॥ १ ॥ निरंतरज्याचे हृदयींविवेक ॥ उपासकएकतोचिधन्य ॥ २ ॥ धन्यतोचिएकसंसारींपाहतां ॥ विवेकेंअनंताठाईंपाडी ॥ ३ ॥ ठाईंपाडीनिजस्वरूपआपुलें ॥ असोनिचारिलेंजन्मोजन्मीं ॥ ४ ॥ जन्मांजन्मींकेलेंपुण्यबहुसाल ॥ तरीच घडेलसंतसंग ॥ ५ ॥ संतसंगजयामानवाआवडे ॥ तेणेंगुणेंघडेसमाधान ॥ ६ ॥ समाधानघडेसज्जनाचेसंगें ॥ स्वरूपाचेयोगेंरामदास ॥ ७ ॥

# अथ पंचीकरणादि अभंग प्रारंभः

## अभंग २७२.

निर्गुणस्वरूपींनिजमायाझाली ॥ तिचेपोटीं आलीगुणमाया ॥ १ ॥ गुणमायेपोटींझालासत्वगुण ॥ सत्वींरजोगुणउद्भवला ॥ २ ॥ रजापासोनियां झालातमोगुण ॥ तमोगुणींजाणव्योमझालें ॥ ३ ॥ व्योमापोटींवायूवायूपोटींतेज ॥ तेजींतेंसहजआपझालें ॥ ४ ॥ आपापासोनियां भूमंडळहोगें ॥ शास्त्रींचीवचनेंदासह्मणे ॥ ५ ॥

## अभंग२७३.

मायेचेंस्वरूपब्रह्मींउद्भवलें ॥ तियेपोटींआलेंमहत्तत्व ॥ १ ॥ महत्तत्वींस त्वसत्वींरजोगुण ॥ तिजातमोगूणरजापोटीं ॥ २ ॥ पोटींपंचभूतेंरजाचि याआलीं ॥ दासह्मणेझालीसृष्टीऐशी ॥ ३ ॥

## अभंग२७४.

पृथ्वीआपतेजवायूतेंआकाश ॥ पांचांचेहेअंशपंचवीस ॥ १ ॥ अस्थिमांस त्वचानाडीआणिरोम ॥ पृथ्वीचेंहेंवर्मसांगीतलें ॥ २ ॥ शुक्लीतशोणीतला- ळआणिमूत्र ॥ स्वेदहेनिश्चितआपतत्व ॥ ३ ॥ क्षुधातृषाआणिआलस्यश यन ॥ पांचवेंमैथुनतेजसाचें ॥ ४ ॥ चलनवलनआणिप्रसारण ॥ निरोध नआकुंचनवायूचेंतें ॥ ५ ॥ कामक्रोधमोहशोकआणिभय ॥ स्थूळदेहान्व येंपंचवीस ॥ ६ ॥ पंचवीसतत्वेंस्थूळहेंवर्तत ॥ ऐकेसावचित्तलिंगदेह ॥ ७ अंतःकरणमनबुद्धिआणिचित्त ॥ पांचवानिश्चितअहंकार ॥ ८ ॥ प्राणआ णिअपानव्यानआणिउदान ॥ समानहेजाणपंचवायू ॥ ९ ॥ चक्षुश्रोत्रजिव्हा घ्राणआणित्वचा ॥ अंशहातेजाचाज्ञानेंद्रियें ॥ १० ॥ वाचापाणीपादशिश्नआ- णिगुद ॥ पांचहीप्रसिद्धकर्मेंद्रियें ॥ ११ ॥ शब्दस्पर्शरूपरसआणिगंध ॥ पां- चहीप्रसिद्धविषयहे ॥ १२ ॥ ऐसेपंचवीसलिंगदेहअंश ॥ ऐशींपंचवीसत- त्वेंझालीं ॥ १३ ॥

## अभंग२७५.

कामक्रोधशोकमोहआणिभय ॥ पंचधाअन्वयआकाशाचा ॥ १ ॥ चळण- वळणआणिप्रसारण ॥ निरोधनआकुंचनवायूचेंतें ॥ २ ॥ क्षुधातृषानिद्रा मैथुनआलस्य ॥ तेजाचेहेअंशपंचविध ॥ ३ ॥ लाळमूत्रशुक्लरक्तआणिम ज्जा ॥ आपजाणवोजापंचविध ॥ ४ ॥ अस्थिमांसत्वचानाडीरोमअंश ॥ दासह्मणेवासदेहातीत ॥ ५ ॥

## अभंग२७६.

अंतःकरणमनबुद्धीआणिचित्त ॥ पुढेंसावचित्तअहंकार ॥ १ ॥ व्यानूतो समानुउदानुतोप्राणु ॥ पांचवाअपानुवायूजाण ॥ २ ॥ श्रोत्रत्वचाचक्षु- जिव्हाआणिघ्राण ॥ तेजाचेहेगुणपंचविध ॥ ३ ॥ वाचापाणीपादशिश्नआ- णिगुद ॥ आपाचेप्रसिद्धपांचगूण ॥ ४ ॥ शब्दस्पर्शरूपरसआणिगंध ॥ ए-

श्रीहेविशदादासह्मणे ॥ ५ ॥

## अभंग २७७.

विष्णुचंद्रब्रह्मानारायणरुद्र ॥ आकाशाचाथोरअंशपाहे ॥ १ ॥ ब्रह्मांडींव्यापकलोकार्कवरुण ॥ रुद्रवायूजाणचाळकतो ॥ २ ॥ दिशावायुरवीवरुणाचाहेत ॥ अश्विनीदेवततेजऐसें ॥ ३ ॥ वन्हीइंद्रनिजाजाणावाउपेंद्र ॥ ब्रह्माआणिसारनिऋतीतो ॥ ४ ॥ शब्दस्पर्शरूपरसआणिगंध ॥ तन्मात्राविशदादासह्मणे ॥ ५ ॥

## अभंग २७८.

विष्णुचंद्रजाणब्रह्मानारायण ॥ पार्वतीरमणसदाशीव ॥ १ ॥ दिशावायूसूर्यज्ञानेंद्रियान्वयें ॥ वरुणनिश्चयेंअरुणतो ॥ २ ॥ तोचिइंद्रवन्हीवामनप्रजापती ॥ पांचवानैर्ऋतीगुदस्थानीं ॥ ३ ॥ स्थानींवायूएकविषयींहीएक ॥ जाहलेंकौतुकसूक्ष्माचें ॥ ४ ॥ सुक्षमींसूक्षमएकआत्माराम ॥ रामदासींवर्मसांपडलें ॥ ५ ॥

## अभंग २७९.

पिंडब्रह्मांडींच्याइंद्रीयदेवता ॥ सांगेनतत्वतांसावचित्त ॥ १ ॥ कर्णाचीदेवतादिशाहेतत्वतां ॥ त्वचेचाधरितापवनचि ॥ २ ॥ डोळियांचासूर्यजिव्हेचावरुण ॥ नासिकाचेंस्थानअश्विनौदेव ॥ ३ ॥ वाचेचातोअग्निहस्ताचातोइंद्र ॥ पायाचाप्रसिद्धवामनतो ॥ ४ ॥ शिश्नींप्रजापतीगुदींतोनैर्ऋती ॥ दशेंद्रियस्थीतीऐशाझाली ॥ ५ ॥ अंतःकर्णाचातोस्वामीलक्ष्मीकांत ॥ मनाचेंदैवतचंद्रमाचि ॥ ६ ॥ बुद्धीचातोब्रह्माचित्तींनारायण ॥ अहंकारजाणसदाशिव ॥ ७ ॥ देहाचीदेवताविराटचिकारण ॥ ब्रह्मांडहेंजाणसंतसंगें ॥ ८ ॥ संतसंगेंसारकरीहाविचार ॥ पावशीलपारसंसाराच्या ॥ ९ ॥ संसाराच्यापारस्वरूपनिर्धार ॥ ब्रह्मसाक्षात्काररदासह्मणे ॥ १० ॥

## अभंग २८०

होतेआठवणतेंचिअंतःकरण ॥ आतांसावधानमनऐका ॥ १ ॥ संकल्पविकल्पहोयनव्हेवाटे ॥ तेंचिमनखोटेंकल्पनिक ॥ २ ॥ होयनव्हेऐसाअनुमानझाला ॥ निश्चयजोकेलातेचिबुद्धी ॥ ३ ॥ निश्चयजो

केलातयाचेंचिंतन ॥ तेंचिचित्तजाणनिश्चयेसी ॥ ४ ॥ अहंकारासवें देहचालताहे ॥ दासह्मणेपाहेअनुभवें ॥ ५ ॥

## अभंग २८१.

जडत्वकठीणतेतेपृथ्वीजाण ॥ मृदुओलेंपणतेंचिआप ॥ १ ॥ आप नानारसधातूबहुवस ॥ उष्णवसतेंजेंतेंचितेज ॥ २ ॥ वायूस्तब्धचळ आकाशनिश्चळ ॥ मायीकसकळदासह्मणे ॥ ३ ॥

## अभंग २८२.

शून्यापासोनियांजन्मआकाशासी ॥ आकाशवायूसीप्रसवलें ॥ १ प्रसवलावायूतयातेजझालें ॥ तेजाचियाआलेंपोटाआप ॥ २ ॥ आपापासोनियांसृष्टीहेजन्मली ॥ ऐशीविस्तारलीमायादेवी ॥ ३ ॥ मायादेवीवळेशून्याकडेंपळे ॥ तेंकाळींरववळेपंचभूतां ॥ ४ ॥ जेंज- यासिव्यालेंतेंतयाभक्षील ॥ अंतींतेंउरेलशून्यएक ॥ ५ ॥ शून्या- चेंस्वरूपपाहतांकांहींनाहीं ॥ तेंशून्यसर्वहीजेथेंआटे ॥ ६ ॥ आहे हेंआटलेंत्याचेंशून्यझालें ॥ शून्यहीविरालेंस्वस्वरूपीं ॥ ७ ॥ स्वरूप पाहीत्याकाळवेळगेली ॥ निजठेवीलाधलीप्राणियासी ॥ ८ ॥ प्राणि- याचेंहीतआहेसंतांपायीं ॥ वेगींशरणजाईआलयारे ॥ ९ ॥ आलया- रेसंतसंगेंमुक्तहोसी ॥ रामीरामदासीहेंचिवर्म ॥ १० ॥

## अभंग २८३.

ब्रह्महेजाणावेंआकाशासारिखें ॥ मायाहेओळखेवायूऐसी ॥ १ ॥ वा यूऐसीमायाचंचळचपळ ॥ ब्रह्मतेंनिश्चळनिराकार ॥ २ ॥ निराकारब्रह्म नाहींआकारलें ॥ रूपविस्तारलेंमायादेवी ॥ ३ ॥ मायादेवीझालीनाम आणिरूप ॥ शुद्धसत्वरूपवेगळेंचि ॥ ४ ॥ वेगळेंचिपरीआहेसर्वांठा- ईं ॥ रिताठावनाहींतयावीण ॥ ५ ॥ तयावीणज्ञानतेंचितेंअज्ञान ॥ ना- हींसमाधानब्रह्मेंवीण ॥ ६ ॥ ब्रह्मेंवीणभक्तीतेंचिपैंअभक्ती ॥ राम- दासींमुक्तीब्रह्मज्ञानें ॥ ७ ॥

## अभंग २८४. (अष्टदेह.)

चारदेहपिंडींचत्वारब्रह्मांडीं ॥ अष्टदेहप्रौढीबोलिजेल ॥ १ ॥ बो लिजेलश्रोतींसावधानव्हावें ॥ दुश्चितनसावेंनिरूपणीं ॥ २ ॥ निरूप

अष्टदेहतेकवण ॥ स्थूळलिंगजाणकारणतो ॥ ३॥ चौथादेहजाणतो महाकारण ॥ पांचवेंलक्षणविराटाचें ॥ ४ ॥ हिरण्यगर्भहेतआणिअ-व्याकृत ॥ आठवानिश्चितमूळमाया ॥ ५ ॥ मूळअष्टदेहीसाक्षीतोवि-देही ॥ रामदासीनाहींजन्ममृत्यू ॥ ६ ॥

## अभंग २८५. (अष्टसृष्टी)

कल्पनेचेपोटींअष्टविधसृष्टी ॥ तेचिआतांगोष्टीसांगईन ॥ १ ॥ सांग-ईनसृष्टीएककल्पनिक ॥ दुजीतेशाब्दीकशब्दसृष्टी ॥ २ ॥ शब्दसृष्टीदू जीतिजीतेप्रत्यक्ष ॥ चौथाजाणलक्षचित्रलेप ॥ ३ ॥ चित्रलेपचौथीपां चवीस्वप्नींची ॥ सृष्टीगंधर्वाचीसाहावीते ॥ ४ ॥ साहावीतेसृष्टीगंधर्वन-गर ॥ सातवीतेज्वरसृष्टीजाण ॥ ५ ॥ सृष्टीजाणदृष्टीबंधनआठवी ॥ सर्वहीमानावीकल्पनीक ॥ ६ ॥ कल्पनीकअष्टसृष्टीचेंस्वरूप ॥ शुद्धस्व स्वरूपनिर्विकल्प ॥ ७ ॥ निर्विकल्पदेवकल्पनेरहित ॥ जाणीजेस्वहीत तेंचिबापा ॥ ८ ॥ तेंचिबापाबुझेसंतांचेसंगतीं ॥ चुकेअधोगतीदासह्म-णे ॥ ९ ॥

## अभंग २८६ (सप्तकंचुक)

पृथ्वीतळींव्याळव्याळातळींज्वाळ ॥ त्यातळींअनळसत्यजाण ॥ १ ॥ सत्यजाणतयातळींतोअनीळ ॥ त्यातळींपोकळव्योमआहे ॥ २ ॥ व्योमातळींअहंकारतोकेवळ ॥ तेणेंब्रह्मगोळधरियेला ॥ ३॥ धरिये-लापुढेंमहत्तत्वअसे ॥ सप्तावरणऐसेंनिरोपिलें ॥ ४ ॥ दशगुणेंथोरए-काहूनिएक ॥ हेसप्तकंचुकदासह्मणे ॥ ५ ॥

## अभंग २८७ (पंचप्रलय)

पांचहीप्रळयसांगईनआतां ॥ जाणिजेतत्वतां दोनपिंडीं ॥ १ ॥ दोनीपिंडीं दोनी॥ ब्रह्मांडीप्रलय ॥ पांचवाअन्वयविवेकाचा ॥ २॥ विवेकाचापंथवि वेकेंजाणावा ॥ योगियांचाठेवानिरूपणें ॥ ३॥ निरूपणींनिद्राप्रलयबोलि-ला ॥ दुजामृत्यूझालाप्राणियासी ॥ ४ ॥ प्राणियासिपिंडींहेदोनप्रळय ॥ ब्रह्मनिद्राक्षयोब्रह्मांडाचा ॥ ५ ॥ ब्रह्मयाचाक्षयोतोब्रह्मप्रलयो ॥ व्यति-रेकअन्वयोविवेकाचा ॥ ६ ॥ विवेकाच्याअंगेंसाधीकसर्वही ॥ स्वस्वरूपींनाहीं चराचर ॥ ७ ॥ चराचरपंचभूतिकमायीक ॥ सिद्धहाविवेकसज्जनांचा ॥ ८ ॥

सज्जनांचाभावसर्वदृश्यवाच ॥ दृश्यातीतदेवजैसातैसा ॥ ९ ॥ जैसाआहे तैसादेवओळखावा ॥ प्रळयपांचवादासह्मणे ॥ १० ॥

## अभंग २८८ ( प्रलय. )

अनावृष्टीधराशतसंवत्सर ॥ तेणेंजीवमात्रसंहारती ॥ १ ॥ संहारती नसेकोणीभूमंडळीं ॥ सूर्यबाराकळीतपईल ॥ २ ॥ तपईलतेणेंजळेल धरणी ॥ काद्रवेयाचीफणीपोळईल ॥ ३ ॥ पोळतांचिवमींविषाचेहल्लाळ ॥ मार्तंडाचेज्वाळएकहोती ॥ ४ ॥ होतीगिरीशृंगभस्मएकरूप ॥ तयालागिआपबुडवील ॥ ५ ॥ बुडवीलधराजळचिनिरवळ ॥ तयासिअनळ शोषूंपाहे ॥ ६ ॥ शोषियेलेंजळउरलाअनळ ॥ तयासिअनीळविझवीत ॥ ७ ॥ विझवितहोयवायोत्यावन्हीसी ॥ विश्रांतीवायूसीनभापोटीं ॥ ८ ॥ नभापोटींचारीभूतेंसामावलीं ॥ नभाकारझालीवृत्तीतेव्हां ॥ ९ ॥ वृत्तीन भाऐसानादळेअन्वय ॥ पांचवाप्रळयदासह्मणे ॥ १० ॥

## ( चत्वारदेहनिरास. ) अभंग २८९. ( स्थूळदेहनिरास. )

भूतपंचकाचेंपंचवीसगुण ॥ याचेंस्थूळजाणउभारलें ॥ १ ॥ उभारलेंस्थूळपांचापंचकाचें ॥ तेंचितूंहेंसाचेंघडेकवी ॥ २ ॥ घडेकेवीद्रष्टादृश्यएकरूप ॥ दृश्याचेंस्वरूपवेगळेंचि ॥ ३ ॥ वेगळेंचिजाणअस्थीमांसत्वचा ॥ विस्तारभूतांचाजाणावाहा ॥ ४ ॥ जाणावाहाद्रष्टास्थूळाचाजाणता ॥ विदेहीतत्वतादासह्मणे ॥ ५ ॥

## अभंग २९० ( सूक्ष्मदेहनिरास )

अंतःकरणादिकहेंसूक्ष्मपंचक ॥ याचासाक्षीएकतूंचिजाण ॥ १ ॥ जाणपंचप्राणसाक्षीविलक्षण ॥ विषयांचाजाणतूंचिएक ॥ २ ॥ तूंचिएकसाक्षीदशइंद्रियांचा ॥ पांचापंचकाचालिंगदेह ॥ ३ ॥ लिंगदेहदृश्यद्रष्टातूंचिएक ॥ बोलिलाविवेकसूक्ष्माचा ॥ ४ ॥ सूक्ष्माचातूंसाक्षीसुक्ष्मावेगळा ॥ दासअवलीळादेहातीत ॥ ५ ॥

## अभंग २९१ ( कारणदेहनिरास )

देहद्वयसाक्षीनेणेंआपणासी ॥ कारणतयासीबोलिजेतें ॥ १ ॥ देहद्वयनेणेआपणासीनेणे ॥ पुसोंजातांह्मणेकळेनाकीं ॥ २ ॥ कळेनाकीमजसाझेंनिरूप ॥ झालासाक्षीरूपसहजचि ॥ ३ ॥ सहजचिझालाकारणाचासाक्षी ॥ स्व

नेणण्याशीजाणता हे ॥ ४ ॥ जाणताहेस्थूळसूक्ष्मकारण ॥ साक्षीविलक्ष णदासह्मणे ॥ ५ ॥

(तुर्या) अभंग २९२ (महाकारणदेहनिरास)

मीचब्रह्म ऐसाअभिमानधरी ॥ जाणावाचतूरींचौथादेह ॥ १ ॥ चौथा देहसर्वसाक्षिणीअवस्था ॥ ऐशीहेव्यवस्थाचौदेहांची ॥ २ ॥ चौदेहांचा गांठीसोडितांस्फुटली ॥ विवेकेंतुटलीदेहबुद्धी ॥ ३ ॥ देहबुद्धीनाहींस्वरूपीं राहतां ॥ चौथादेह आतांकोठेंआहे ॥ ४ ॥ कोठेंआहेअहंब्रह्मऐसाहेत ॥ देहींदेहातीतरामदास ॥ ५ ॥

अभंग २९३. (परिपक्वउन्मनी)

विदेहासिकैचेंदेहाचेंबंधन ॥ बोलिजेअज्ञाननिरसावया ॥ १ ॥ निरसाव याकायवांझेचीकुमारी ॥ मृगजळपुरींउतरावें ॥ २ ॥ उतरावेंवीयस्वप्नीं च्यासर्पाचें ॥ आणिनिःसंगाचेंसंगदुःख ॥ ३ ॥ संगदुःखतुटेअजन्म्या सिजन्म ॥ नाथिलाचिभ्रमबाधितसे ॥ ४ ॥ बांधीतसेभ्रमसंतसंगाविण ॥ रामदासींखूणसाधूसंग ॥ ५ ॥

अभंग २९४. (अनुभव)

ओळखतांज्ञानओळखीमोडली ॥ भेटीहेजोडलीआपणाची ॥ १ ॥ आ पणाचीभेटीझालीबहुदिसां ॥ तुटलावळसामीपणाचा ॥ २ ॥ मीपणा चाभावदेवेंकेलावाव ॥ दासह्मणेदेवप्रगटला ॥ ३ ॥

अभंग २९५.

प्रगटलादेवजयाचेअंतरीं ॥ तयानाहींउरीमीपणाची ॥ १ ॥ मीपणा- चीउरीतूंपणभेरतां ॥ आपणापहातांवावझाली ॥ २ ॥ झालीवावदेवदे खतादाटणी ॥ दासह्मणेवाणीवेडावली ॥ ३ ॥

अभंग २९६.

मारीच्यापोटाब्रह्मचारीआला ॥ विचारितांझालाबापतिचा ॥ १ ॥ तोपुरुषतेतोमायराणी ॥ शब्दविचक्षणींविवरावा ॥ २ ॥ विचा होयनातूहीजामातू ॥ प्रपितामहीमातमिथ्यानव्हे ॥ ३ ॥ मिथ्या कदांहादेहसंबंधू ॥ विस्तारविविधूसोयरीका ॥ ४ ॥ सोयरेसंबंधू निर्गुणा ॥ मिथ्याज्यात्याखुणादासह्मणे ॥ ५ ॥

ह्रतांस्थूळाचाचाळक ॥ सूक्ष्माचाएकमनप्राण ॥ ३ ॥ मनप्राणेंवीण हेंकांहींघडेना ॥ हेंचिमनाआणाविवेकीहो ॥ ४ ॥ विवेकीहोतुह्मीं विवेकपाहावा ॥ संसाराचागोवाकोणकरी ॥ ५ ॥ कोणकरीतसे सर्वहीकरणी ॥ दासनिरूपणींसावधान ॥ ६ ॥

## अभंग ३०३.

माणुसचिब्रह्मशोधितांहोईल ॥ प्रचीतयेईलरोकडीच ॥ १ ॥ रोकडीचप्रचीतीयेतगुरुसुखें ॥ आणिसर्वसुखेंहातायेती ॥ २ ॥ हातायेतेंबीजसज्जनांचेंगूज ॥ प्रचीतीचाभोजआनंदला ॥ ३ ॥ आनंदलाप्राणीसद्गुरुसेवितां ॥ क्षुधार्थीजेवितांजेवीतृप्त ॥ ४ ॥ तृप्तझालीबुद्धीनिर्गुणाचीऋद्धी ॥ लागलीसमाधीरामदासीं ॥ ५ ॥

## अभंग ३०४.

स्वरूपसांडूनिमीचदेहभावी ॥ तोजीवरौरवींपचईल ॥ १ ॥ पचईल नरकींदेहाच्यासंबंधें ॥ सर्वज्ञानबोधेंसांडवला ॥ २ ॥ सांडूनिविवेक वेदमहावाक्य ॥ जीवशीवऐक्यजयाचेनी ॥ ३ ॥ जयाचेनितुटेसंसारबंधन ॥ तयाचेंवचनदृढधरा ॥ ४ ॥ दृढधरामनींअहंब्रह्मऐसें ॥ सांगतोविश्वासेंदासह्मणे ॥ ५ ॥

## अभंग ३०५.

खोटेंनिवडितांखरेंनाणेंउरे ॥ तैसाचविचारतत्वज्ञानें ॥ १ ॥ तत्वज्ञान खोटेंजाणोनित्यागावें ॥ मगओळखावेंपरब्रह्म ॥ २ ॥ परब्रह्मखरें संतसंगेंकळे ॥ विवेकेंनिवळेमार्गकांहीं ॥ ३ ॥ मार्गकांहींआतांपरिक्षा जाणता ॥ दिशाभुलीहोतांमार्गचुके ॥ ४ ॥ मार्गचुकेऐसेंमनींनकरावें ॥ सार्थककरावेंदासह्मणे ॥ ५ ॥

# प्रश्नोत्तरें प्रारंभः

## अभंग ३०६. (प्रश्न.)

नमोवागेश्वरीशारदासुंदरी ॥ श्रोताप्रश्नकरीवक्तयासी ॥ १ ॥ वक्तयासी पूसेजीवहाकवण ॥ शिवाचेंलक्षणसांगामज ॥ २ ॥ सांगा[illegible]नआत्माकेसातोपरमात्मा ॥ बोलिजेअनात्माकवणतो ॥ ३ ॥ को[illegible]स्ताप्रपंचकोणेंकेलासंच ॥ मागुताविसंचकोणकरी ॥ ४ ॥ कोणतेअ[illegible]विद्या

### अभंग २९७. ( मायाब्रह्मविवरण )

हिरियाचे पोटीं मांदुसाच्या कोटी ॥ सुवर्णाचे ताटीं कांचखंड ॥ १ ॥ काचखंड हेमीं तेसें हृदयरामीं ॥ स्वरूपविश्रामीं भ्रमूं माया ॥ २ ॥ माया हे असार स्वरूप तें सार ॥ पाहिला निर्धार रामदासीं ॥ ३ ॥

### अभंग २९८.

बाल्यनारी केळ भीतरी करोटी ॥ तैशा परी सृष्टी स्वस्वरूपीं ॥ १ ॥ स्वस्वरूपीं माया जैसी द्रुमीं छाया ॥ कांते भासे वायां मृगजळ ॥ २ ॥ मृगजळ भासे मार्तंडा करितां ॥ स्वरूपीं पाहतां बिंब नाहीं ॥ ३ ॥ नाहीं जेथें बिंब कैंचें प्रतिबिंब ॥ एकचि स्वयंभ स्वस्वरूप ॥ ४ ॥ स्वस्वरूपीं भासना थिला आभास ॥ धरीजे विश्वास दास ह्मणे ॥ ५ ॥

### अभंग २९९.

तत्वमसी महावाक्याचा उपदेश ॥ पाहिला निरास चौदेहांचा ॥ १ ॥ तयामध्यें सार मानली साचार ॥ भक्ती निरंतर राघवाची ॥ २ ॥ कुंडलनी गोल्हाट श्रीहाट त्रिकूट ॥ आणि मूळपीठ ब्रह्मरंध्र ॥ ३ ॥ मंत्र तंत्र मुद्रा आसन समाधी ॥ दास ह्मणे बुद्धी देखण्याची ॥ ४ ॥

### अभंग ३००. ( उपसंहार )

जीवशीव पिंड ब्रह्मांड रचना ॥ उभारूनि पुन्हा संहारावी ॥ १ ॥ सर्व खटपट सांडूनिया मागें ॥ भक्तीचे नियोगें समाधान ॥ २ ॥ अनंतपंदानें योग धूम्रपानें ॥ नानातीर्थाटणें दास ह्मणे ॥ ३ ॥

### अभंग ३०१.

शरीराचीं तत्वें तत्वांचें शरीर ॥ पाहवा विस्तार विस्तारूनि ॥ १ ॥ विस्तारूनि गुणीं तत्वांची मांडणी ॥ सिद्धांत झाडणी आरंभावी ॥ २ ॥ आरंभींच तत्व वेगवेगळालें ॥ मीपण गळालें विवेकानें ॥ ३ ॥ विवेकें पाहतां कोणी चना दळे ॥ समजतां कळे सर्व कांहीं ॥ ४ ॥ सर्व कांहीं लाभ होतो निरूपणें ॥ श्रवण मननें दास ह्मणे ॥ ५ ॥

### अभंग ३०२.

माणूसचि ब्रह्म होत आहे परी ॥ हेंचि हें विचारी आलयारे ॥ १ ॥ आलयारे माणूस हें कोण ह्मणावें ॥ हें बरें जाणावें शोधूनिया ॥ २ ॥ शोधूनियां पा

सांगावीतेविद्या ॥ कैसें आहेआद्यास्वरूपतें ॥ ५ ॥ स्वरूपींतीमायाकै-सीमूळमाया ॥ इच्छीचाळवायाकोणआहे ॥ ६ ॥ आहेकैसेंशून्यकैसें नेंचैतन्य ॥ समाधानअन्यकवणतें ॥ ७ ॥ कवणजन्मलाकवणामृत्यू आला ॥ बद्धमुक्तझालाकवणतो ॥ ८ ॥ कवणजाणताकवणाचीसत्ता ॥ मोक्षहीनत्वताकोणसांगा ॥ ९ ॥ सांगाआह्मांखूणसगूणनिर्गूण ॥ पंचवीसप्रश्नदासकरी ॥ १० ॥

## अभंग ३०७. ( उत्तर )

नमोवेदमातानमोत्याअनंता ॥ सांगोंप्रश्नआतांश्रोतयांचे ॥ १ ॥ श्रो-तयांचाप्रश्नजीवतोअज्ञान ॥ जयासर्वज्ञानतोचिशीव ॥ २ ॥ शिवाप रआत्मात्यापरपरमात्मा ॥ बोलिजेअनात्माअनिर्वाच्य ॥ ३ ॥ वाचाह्या प्रपंचमायीकजाणावा ॥ घडीमोडीदेवापासोनियां ॥ ४ ॥ विषयअवि द्यात्यागतोसद्विद्या ॥ निर्विकल्पआद्यास्वस्वरूप ॥ ५ ॥ कल्पनाहेमाया सत्यमूळमाया ॥ इच्छीचाळावयाचैतन्यतें ॥ ६ ॥ नकारतेंशून्यव्यापक चैतन्य ॥ ईश्वरअनन्यसमाधान ॥ ७ ॥ जीवहाजन्मलाजिवामृत्यूआ ला ॥ बद्धमुक्तझालातोचिजीव ॥ ८ ॥ ईश्वरजाणताईश्वराचीसत्ता ॥ मो-क्षहातत्वताईश्वरचि ॥ ९ ॥ ईश्वरनिर्गूणचेतवीसगूण ॥ हेचिब्रह्मखूण दासह्मणे ॥ १० ॥ दासह्मणेसर्वमायेचेंकरणें ॥ रूपसर्वजाणेअनुभवी ॥

## अभंग ३०८. ( प्रश्न. )

संतसंगेंतुजकायप्राप्तझालें ॥ सांगपाव हिलेंमजपाशी ॥ १ ॥ मज पाशीसांगकोणमंत्रतूज ॥ कायआहेगूजअंतरींचें ॥ २ ॥ अंतरींचेंगू-जकायसमाधानी ॥ मंत्रजपध्यानकैसेंआहे ॥ ३ ॥ कैसेंआवाहनकै-सेंविसर्जन ॥ कैसेंपिंडज्ञानसांगेमज ॥ ४ ॥ सांगामजकोणबुद्धीउपा सना ॥ मुद्रातेआसनासांगेमज ॥ ५ ॥ सांगापचीकर्णचि [illegible] वेनुष्टय ॥ कैसेनेअद्वयजीवशीव ॥ ६ ॥ जीवशीवऐक्यझालेंकोणे [illegible] ॥ सांगा-मजप्रतीअष्टदेह ॥ ७ ॥ अष्टदेहपिंडब्रह्मांडरचना ॥ त[illegible]णाचनासं गेमज ॥ ८ ॥ सांगमजभक्तीकैशीतेविरक्ती ॥ सायोज्यता [illegible] कवणे ते ॥ ९ ॥ कोणतेंसाधनकोणतेंबंधन ॥ ऐसेंकेलेंप्रश्नरामदासें ॥ १० ॥

## अभंग ३०९. ( उत्तर )

संतसंगें मज काय मास झालें ॥ सांगतों व दिलें तुज पाशीं ॥ १ ॥ मंत्र हाता रक राम नाम एक ॥ गूज हरादिक चिंतिताती ॥ २ ॥ ज्ञान समाधान सगुणाचें ध्यान ॥ निर्गुणीं अभिन्न आपणचि ॥ ३ ॥ दृश्य आवाहन दृश्य विसर्जन ॥ तेथें पिंड ज्ञान आढळेना ॥ ४ ॥ उपासना हरिमुद्रा अगोचरी ॥ सिद्धासनावरी समाधान ॥ ५ ॥ पंचीकरण पिंड ब्रह्मांड आवरण ॥ साक्षी तो आपण एकलाची ॥ ६ ॥ जीवशिव ऐक्य झाले येणें रीती ॥ प्रकृतीच्या अंतीं द्वैत केचें ॥ ७ ॥ अष्ट देह स्थूळ सूक्ष्म कारण ॥ चौथा देह जाण महाकारण ॥ ८ ॥ विराट हिरण्य आणि अव्याकृती ॥ आठवा प्रकृतीमूळ माया ॥ ९ ॥ एकतत्त्व जाण त्याचे नांव भक्ती ॥ जाणावी विरक्ती संगत्याग ॥ १० ॥ सायुज्यता मुक्ति ते चि ते अचळ ॥ साधनाचें मूळ गुरुदास्य ॥ ११ ॥ गुरुदास्यें चुके संसारयातना ॥ जाणती लखुणा अनुभवी ॥ १२ अनुभवें वीण होय सर्वशीण ॥ निरसिले भ्रम दास ह्मणे ॥ १३ ॥ ॥

## अभंग ३१० (तत्त्वमसि)

तत्त्वमसि अहं ब्रह्म अस्मि ऐसें ॥ जाण हें विश्वासें महावाक्य ॥ १ ॥ वेदवाक्य रामीं रामदास पाहे ॥ मुख्य पद ला हे निरंजन ॥ २ ॥ अयमात्मा ब्रह्म आणि ज्ञान ब्रह्म ॥ दास ह्मणे वर्म वेदवाक्य ॥ ३ ॥ ॥ ॥

## अभंग ३११ (केवलव्यतिरेक)

ताक ही पांढरें दूध ही पांढरें ॥ चवी जेवणारे जाणताती ॥ १ ॥ जाणतातीं चवी गुळसाखरेची ॥ पाहातां नेथें चीभेद आहे ॥ २ ॥ भेद आहे केसा अभेदाचे परी ॥ जाणिजे चतुरीं दास ह्मणे ॥ ३ ॥ ॥ ॥

## अभंग ३१२ (निरूपणाचा महिमा)

निरूपणा ऐसें नाहीं समाधान ॥ आणीक साधन आढळेना ॥ १ ॥ भक्ती ज्ञान घडे वैराग्य आतुडे ॥ भावार्थ सांपडे निरूपणें ॥ २ ॥ शांती क्षमा दया नैराश्य ता मनीं ॥ अवस्था उन्मनी तेणें गुणें ॥ ३ ॥ रिद्धिसिद्धी दासी होती निरूपणें ॥ श्रवण मननें निदिध्यासें ॥ ४ ॥ भ्रांतीचा संदेह तुटे एकसरा ॥ दास ह्मणे करा निरूपण ॥ ५ ॥ ॥ ७ ॥ ॥

## अभंग ३१३

निरूपणें जनीं लाभे सर्व कांहीं ॥ दुजें ऐसें नाहीं पाहों जातां ॥ १ ॥ सारा

चेंही सारमना अगोचर॥ तेंलाभे साचार निरूपणें॥२॥ दाखवितां नये बोलिलें न जाय॥ त्याची कळे सोय निरूपणें॥३॥ मनासि नाकळे मीपणें ना ढळे॥ तें गूज निवळे निरूपणें॥४॥ विश्र्पत्तीचें कोडें तर्कीचें सांकडें॥ तें लाभे रोकडें निरूपणें॥५॥ मन हें चंचळ तें होय निश्चळ॥ साधनाचें फळ दास ह्मणे॥६॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥

## अभंग ३१४

गतीचें लक्षण हें चि हें प्रमाण॥ श्रवण मनन सर्वकाळ॥१॥ सर्वकाळ सारासार विचारणा॥ वस्तुची चाळणा निरंतर॥२॥ निरंतर ध्यास लागला अंतरीं॥ धारणा हे धरी निर्गुणाची॥३॥ निर्गुणासंगती निर्गुण होइजे॥ मत्यावृत्ती कीजे निरूपणें॥४॥ निरूपणें होय अलभ्याचा लाभ॥ साधन सुलभ दास ह्मणे॥५॥ ॥ छ ॥ ॥

## अभंग ३१५

वस्तूचा निर्धार होय पारंपार॥ साधनाचें सार निरूपण॥१॥ निरूपणा ऐसें सार नाहीं दुजें॥ जेणें सर्व बीजें हाता येती॥२॥ हाता येती बीजें ज्ञानाचीं सहज॥ निःसंदेह भोजना चनसे॥३॥ नाचतसे सदा विवेक अंतरीं॥ मायामोहपुरीं बुडो नेदी॥४॥ बुडो नेदी कदा काळीं निरूपण॥ रामदासीं खूण संतसंग॥५॥ ॥ ॥

## अभंग ३१६

निरूपण सार अद्वैत करावें॥ तेणें उद्धरावें निश्चयेंसी॥१॥ निश्चयेंसि पाहे आपुली ओळखी॥ तोचि एक सुखी जनांमध्यें॥२॥ जनांमध्यें रूखी परत्र साधन॥ संसार बंधन तया नाहीं॥३॥ तया नाहीं देहबुद्धीची अहंता॥ देहीं विदेहता वस्तुरूप॥४॥ वस्तुरूप होय मीपण त्यागीतां॥ शाश्वत भावितां दास मुक्त॥५॥ ॥

## अभंग ३१७

निरूपणें भक्ति निरूपणें ज्ञान॥ अनुताप पूर्ण निरूपणें॥१॥ निरूपणें योग योगाचा सैयोग॥ निरूपणें त्याग घडतसे॥२॥ घडतसे सर्व कांहीं निरूपणें॥ बाणती लक्षणें सज्जनाचीं॥३॥ सज्जनाचीं मतें सज्जन जाणती॥ येर तेने जाणती जाणपणें॥४॥ जाणपणें नेण-

त्याहोयसमाधान।। करावेंमननसंगातीत।। ५।। ।। ।।

अभंग ३१८

पूर्णसमाधानहोयनिरूपणें।। परीजाणपणेंबुडवीलु।। १।। बुडवील देहातीतसमाधान।। देहअभिमानवाढवीला।। २।। वाढविलातर्क यांनिरूपणीं।। जाणिवेपापिणीकायकेलें।। ३।। कायकेलेंऐसेंजा णतजाणतां।। स्वरूपींअहंताकामानये।। ४।। कामानयेदेहबुद्धीचे जाणणें।। दासनिरूपणेंसावधान।। ५।। ।। ७ ।। ।।

अभंग ३१९

केलेंचिकरावेंपुनः निरूपण।। तरीबाणेखूणकांहींएक।। १।। कांहींए ककाळनिरूपणेंगेला।। तोचिएकभलासमाधानी।। २।। समाधानी भलानिरूपणींराहे।। पाहिलेंचिपाहेनिरूपण।। ३।। निरूपणपाहे श्रवणमनन।। होयसमाधाननिदिध्यासें।। ४।। निदिध्यासएकव स्तुचाधरावा।। संसारतरावादासह्मणे।। ५।। ।। ७।। ।।

अभंग ३२०

एकदांजेवितांनव्हेसमाधान।। प्रतिदिनींअन्नखाणेंलागे।। १।। तैसेंनिरूपणकेलेंचिकरावें।। परिनकरावेंउदासीन।। २।। प्रतिदि नींअन्नप्रत्यहींजीवन।। देहसंरक्षणकरावया।। ३।। प्रत्यहींसंसा रींबोलावेंलागतें।। कांहींकेलियातेंसरेनाकीं।। ४।। प्रत्यहींहादे हपाळावालागतो।। शुद्धकरावातोरात्रंदिवस।। ५।। प्रत्यहींदेहा नेंभोगिलेंभोगावें।। त्यागिलेंत्यागावेंदासह्मणे।। ६।। ।।

अभंग ३२१ (प्रचीतीआणिअनुमान)

प्रचीतीवेग सर्वकांहीं।। निर्फळचिपाहीअप्रचीती।। १।।
अप्रचीती केंचेंतेथें।। निर्फळचिस्वार्थेंकासावीस।। २।।
प्रचीतीच याअंगींनसे।। संभ्रमाचेंपिसेंलाभेंवीण।। ३।।
लाभेंवीण ..निलासुलभ।। लाभनाहींक्षोभप्रगटला।। ४।।
स्र ।भकेलानिरर्थक।। प्रचीतीसार्थकदासह्मणें।। ५।। ।।

अभंग ३२२

प्रचा...चाभक्तप्रचीतीचादेव।। करावाउपावसप्रचीत।। १।। प्र

चीनीचा वेद्य प्रचीतीनीची मात्रा ॥ प्रचीतीच्या मंत्रा पाठ कीजे ॥२॥
प्रचीतीनें कोणी एक तें पाहावें ॥ जन ओळखावे प्रचीतीनें ॥३॥ प्र-
चीतीनें इष्ट प्रचीतीनें मित्र ॥ प्रचीतीनें सूत्र कोणी एक ॥४॥ कोणी
एक काय प्रचीत उपाय ॥ दास ह्मणे सोय प्रचीतीची ॥५॥ ॥

## अभंग ३२३

प्रत्ययाचें ज्ञान तें चि तें प्रमाण ॥ येर अप्रमाण सर्व कांहीं ॥१॥ सर्व-
कांहीं धर्म आणि कर्माकर्म ॥ चुकलिया वर्म व्यर्थ जाती ॥२॥ व्यर्थ
जाती जन्म ज्ञानावांचोनीयां ॥ केलें कष्ट वांयां निरर्थक ॥३॥ निर
र्थक जन्म पशुचियेपरी ॥ जंव तें अंतरीं ज्ञान नव्हे ॥४॥ ज्ञान नव्हे
सोपें नेणें आधीं पाहावें ॥ शाश्वत शोधावें दास ह्मणे ॥५॥ ॥

## अभंग ३२४

संज्ञायाच्या कर्में संज्ञायीं पडला ॥ तो कोणी सोडीला ज्ञानेंवीण ॥१॥
ज्ञानेंवीण देवकेंचा ठायीं पडे ॥ अज्ञानें बापुडे गुंडाळले ॥२॥ गुंडाळ-
ला सर्व लोकिकां करितां ॥ लोकीक पाहातां उद्धरीना ॥३॥ उद्धरीना
लोक हा कोणी कोणाला ॥ व्यर्थ चि देवाला अंतरावें ॥४॥ अंतरावें
व्हावें बहुतां आधीन ॥ बहुतांचें मन राखवेना ॥५॥ राखवेना म-
नया बहुजनांचें ॥ आणि सज्जनांचें वर्म चुके ॥६॥ वर्म चुके कर्म
आडवें चि आलें ॥ नाहीं ओळखीलें आत्मयासी ॥७॥ आत्मया
सि जाणे तो चि एक भला ॥ संसारीं सूटला विवेकानें ॥८॥ विवेकानें
लाभ करावा आपुला ॥ लोकिकीं देयालो सांडूनये ॥९॥ सांडूनये-
ज्ञान सगुण भजन ॥ आत्मनिवेदन ओळख ... ॥ ओळखावी
भक्ती सायुज्यता मुक्ती ॥ येणें होय गती दा ... १ ॥ ॥

## अभंग ३२५

अर्थावीण पाठ कासया करावे ॥ व्यर्थ चि मर ... नीयां ॥१॥
घोकूनीयां काय वेगीं अर्थ पाहे ॥ अर्थरूप राह ...
होऊनीयां अर्थ सार्थक करावें ॥ रामदास भावें प्रार्थी ...

## अभंग ३२६ ( प्रचीती )

पोट भरावया मांडिला उपवास ॥ झाला कासावीस अ

राजापा हावयामज धुंडाळितो ॥ कासावीस होतो वाउगाचि ॥ २ ॥ द्रव्यसाधावया निर्द्रव्यांचा संग ॥ तेथें कैंचें मग द्रव्य मिळे ॥ ३ ॥ ब्रह्मसाधावया कर्ममार्गें गेला ॥ तंव कर्में केला कासावीस ॥ ४ ॥ सुटका व्हावया बंधनचि केलें ॥ नेणें तें सुटलें केवीं घडे ॥ ५ ॥ केवीं घडे दृढरोगें आरोग्यता ॥ कुपथ्यानें व्यथा वाढतसे ॥ ६ ॥ एक व्यथा एक औषध घेतलें ॥ दास ह्मणे झालें नयापरी ॥ ७ ॥ ॥ छ ॥ ॥

## अभंग ३२७

चित्त आहे कैसें मन तें णनें कैसें ॥ शुद्ध होनें कैसें विचारावें ॥ १ ॥ वैद्य ओळखेना रोग ही कळेना ॥ औषध मिळेना मप्रचीतीचें ॥ २ ॥ अनुमानें देव अनुमानें भक्त ॥ अनुमानें मुक्त अनुमानी ॥ ३ ॥ अनुमानें केलें अनुमानें कल्पिलें ॥ निर्फळ जाहालें सर्व कांहीं ॥ ४ ॥ सर्व कांहीं बरें प्रचीती आलीया ॥ दास ह्मणे वांयां अप्रचीती ॥ ५ ॥ ॥

## अभंग ३२८ (मज्ञायावर)

एक घाय दोन खंड ॥ ऐसें बोलावें रोकड ॥ १ ॥ जेणें उठती संशय ॥ तें बोलणें काम नये ॥ २ ॥ बहुविधा झालें ठावें ॥ सत्य कोणी ही जाणावें ॥ ३ ॥ रामीं रामदास ह्मणे ॥ एक निश्चयें बोलणें ॥ ४ ॥ ॥

## अभंग ३२९

प्राणी जेणें पंथें गेला ॥ तोचि बहुविध झाला ॥ १ ॥ आतां कोणें वाटें जावें ॥ तेथें संशयीं पडावें ॥ २ ॥ दो हो ठायीं मार्ग झाला ॥ प्राणी मध्यें उभा ठेला ॥ ३ ॥ रामदास ह्मणे जनां ॥ पुढें वाटचि दिसेना ४

## अभंग ३३०

अवघे अंधारें दाटले ॥ डोळे असतांचि गेले ॥ १ ॥ कोठें पाउल ठेवावें ॥ कांहीं दिसेना स्वभावें ॥ २ ॥ खांचखळगे कांटा खडा ॥ ऐसा कळेना निवाडा ॥ ३ ॥ रामीं रामदास ह्मणे ॥ काय करितील शाहाणे ॥ ४ ॥

## अभंग ३३१

वेकल्प डोंगर ओसणें ॥ झाड खडा ब्रह्मारण्य ॥ १ ॥ आतां कोणीकडे जावें ॥ अवघें अरण्य स्वभावें ॥ २ ॥ रान झालें करकरीत ॥ पक्षी वनचरें बोभत ॥ ३ ॥ रामदास ह्मणे भला ॥ तेथें दिवस मावळला

## अभंग ३३२

॥४॥
सातपांचगांवेंवारा॥अवघाएकचिचोहरा॥१॥तेथेंकोणीकडेजा
वें॥अवघीवारचिस्वभावें॥२॥कोणी दिसेनायळसी॥वाटपुसावी
कोणासी॥३॥रामींरामदासह्मणे॥तैसेंसंज्ञायींबोलणें॥४॥ ॥

## अभंग ३३३ (सद्गुरुमहिमा)

गुरुचीणप्राणीत्याहोयजाचणी॥सत्यमाझीवाणीमिथ्यानव्हे॥१
॥मिथ्यानव्हेसत्यसांगतोंतुह्माला॥अंतींयमघालाचुकेनाकीं॥२
॥चुकेनाकींयमयातनायाजनां॥वेगींनिरंजनाठायींपाडा॥३॥ठा
यींपाडाआधींदेवनिरंजन॥लावाननमनसद्गुरूसि॥४॥सद्गुरूची
नाहींजयालाओळखी॥तयाझोकाझोकीयातनेची॥५॥यातने
चीचिंतातुटेएकसरी॥वेगींगुरुकरीदासह्मणे॥६॥ ॥ ॥

## अभंग ३३४

प्रपंचींअसोनिपरमार्थकरावा॥बराविवरावानिरंजन॥१॥निरं
जनदेवप्रगटेअंतरीं॥मगभरोवरीकरीनाकां॥२॥करीनाकांपरी
संसारबाधीना॥परीतोसाधीनाकायकरूं॥३॥कायकरूंदेवालो
कीकउपाय॥धरवेनासोयशाश्वताची॥४॥शाश्वताचीसोयस
माधानहोय॥मोक्षाचाउपायसद्गुरूचि॥५॥सद्गुरुसंगतींचुकेअ
धोगती॥दासह्मणेमतीपालटावी॥६॥ ॥७॥ ॥

## अभंग ३३५

सँसारकरावाफ़रवेंयथासांग॥परीसंतसंगमनींधरा॥१॥मनीं
धरासंतसंगतीविचार॥येणेंपैलपारपाविजेतें॥२॥पाविजेतें-
याचीप्रचीतीपाहावी॥निरूपणींव्हावीअतिप्रीती॥३॥अतिप्री
तीतुह्मीनिरूपणींधरा॥सँसारींउद्धराअसोनीयां॥४॥असोनि
यांनाहींमायासर्वकांहीं॥विवंचूनीपाहीदासह्मणे॥५॥ ॥

## अभंग ३३६

अहोसद्गुरूचीकृपा॥तेणेंदाखवीस्वरूपा॥१॥तोहागुरुपरब्रह्म॥
जेणेंकेलेंस्वयेंब्रह्म॥२॥धरासद्गुरुचरण॥जेणेंचुकेजन्ममरण॥
३॥अहोसद्गुरुतोचिदेव॥दासह्मणेधराभाव॥४॥ ॥ ॥

अभंग ३३७ (सत्संगति व कुसंगति)

भगवंतींजेरततेनरपावन॥ येरांहोयपतनभवार्णवीं॥ १॥ परिसा चेसंगेंलोहाचेंसुवर्ण॥ येरहेपाषाणअधोगती॥ २॥ मेलागिरिसं गसर्वांवृक्षांघडे॥ चेळतोनिवडेवेगळाची॥ ३॥ भृंगीचियासंगें आळीभृंगीहोय॥ उंदीरतोंनव्हेकदाकाळीं॥ ४॥ रामदासींराम हृदयींअभंग॥ दुर्जनाचासंगदूरकरी॥ ५॥ ॥ ५॥ ॥

अभंग ३३८

साधूसंगेंसाधूभोंदूसंगेंभोंदू॥ वाद्यासंगेंवादूहोतअसे॥ १॥ होत असेलाभभल्याचेसंगतीं॥ जायअधोगतीदुष्टांसंगें॥ २॥ दुष्टां संगें झालादुष्टमहापापी॥ होतसेनिःपापीसाधूसंगें॥ ३॥ संग-जयाजेसा लाभतयातैसा॥ होतसेअपैसाअनायासें॥ ४॥ अना यासेंगतीचुकेअधोगती॥ धरितांसंगतीसज्जनांची॥ ५॥ स-ज्जनांचीकृपाजयालागीं होय॥ तयालागींसोयपरत्रींची॥ ६ ॥ परत्रींचीसोयभक्तीच्याउपायें॥ चुकतीअपायदासह्मणे॥ ७॥

अभंग ३३९

चंदनाचेसंगेंचंदनचिहोती॥ होयकाळीमातीकस्तुरिका॥ १॥ कस्तुरिकाहोयकस्तुरीच्यायोगें॥ साधूचेनिसंगेंसाधूजन॥ २॥ साधूजनहोतीसंगतीधरितां॥ मिळणीमिळतांगंगाजेवीं॥ ३॥ जेवितांअमृतअमरहोईजे॥ अचळपाविजेसाधूसंगें॥ ४॥ सा धूसंगेंदेवआपणहोईजे॥ अद्वैतलक्षिजेबाणलीया॥ ५॥ बाण लीयाअंगींनिःसंगाचासंग॥ होईजेनिःसंगआपणचि॥ ६॥ आपणचिध्यानींबेसतांआसनीं॥ जनींआणिवनींदेवभासे ७ देवभासेतेणेंआपणभुलला॥ तेणेंगुणें झालादेवअंगें॥ ८॥ दे वाचेसंगतींदेवचिहोईजे॥ चतुर्भुजराजेवैकुंठींचे॥ ९॥ वैकुं-ठींचेराजेध्यातीअहर्निशीं॥ वंदितीसाधूसीदासह्मणे॥ १०॥

अभंग ३४०

दुर्जनसंगतीकदाधरूंनये॥ घडतीअपायबहुविधा॥ १॥ बहुवि धाझालेअपायबहुतां॥ तेचिसांगोंआतांसावकाश २ कुसंग

हेमाया धरितां हे संगती ॥ गेले अधोगती नेणों किती ॥ ३ ॥ चांडाळा संगतीं होइजे चांडाळ ॥ होय पुण्यशीळ साधूसंगें ॥ ४ ॥ बहुत चिरलें फुटोनियां गेलीं ॥ संगतीनें केलीं रुधिराच्या ॥ ५ ॥ कुरुंदासंगतीं झिजलाचंदन ॥ कुसंगें जीवन नासतसे ॥ ६ ॥ खराचे सांगातीं नासे मुक्ताफळ ॥ होतसे तात्काळ कळाहीन ॥ ७ ॥ लाखेचे संगतीं सोनें होय उणें ॥ दूध हे लवणें नासतसे ॥ ८ ॥ दुर्जना संगतीं सज्जन दासळे ॥ क्रोध हा प्रबळे अकस्मात ॥ ९ ॥ दास ह्मणे संगत्यागा दुर्जनाचा ॥ धरा सज्जनाचा आदरेंसी ॥ १० ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥

## अभंग ३४१

सुपुत्र संसारीं कुळाचें मंडण ॥ वंशउध्दरण हरिभक्ति ॥ १ ॥ हरिभक्ती तारी बेताळीस कुळें ॥ भक्तीचेनि बळें जगदोद्धार ॥ २ ॥ जगदोद्धार करी सुपुत्र संसारीं ॥ येर अनाचारी पापरूपी ॥ ३ ॥ पापरूपी नर अभक्त जाणावे ॥ जयां सिनेण ये देवराणा ॥ ४ ॥ देवराणा वळे देखोनी यां भाव ॥ दास ह्मणे अभावका मानये ॥ ५ ॥ ॥ ॥

## अभंग ३४२

धन्य त्याचें कुळ धन्य त्याचा वंश ॥ जे कुळीं हरिदास अवतरले ॥ १ ॥ धन्य ते जननी धन्य ते चि कुशी ॥ जे हरिदासासी प्रसवली ॥ २ ॥ धन्य ते संबंधी संतांचे सोयरे ॥ सत्संगें उद्धरे कुळ ज्यांचे ॥ ३ ॥ धन्य तो पैं ग्राम धन्य तो पैं देश ॥ धन्य हरिदास वैष्णवांचा ॥ ४ ॥ धन्य त्यांचें सख्य वैष्णवीं सर्वदा ॥ ते सखे गोविंदाजीवलग ॥ ५ ॥ धन्य ते निंदक निंदिती सज्जन ॥ तेणें भावें ध्यान घडे त्यांसी ॥ ६ ॥ धन्य ते भाविक वंदिती हरिदास ॥ तया हृषीकेश वंदीतसे ॥ ७ ॥ धन्य दास दासी सज्जन सेवेसी ॥ तेही सुरवरांसी वंद्य होती ॥ ८ ॥ धन्य पशू श्वान वैष्णवां गृहींचे ॥ कळिकाळ त्याचे पाय वंदी ॥ ९ ॥ रामदास ह्मणे तरी धन्य होणें ॥ सत्संग लाधणें वैष्णवांचा ॥ १० ॥ ॥ छ ॥ ॥

## अभंग ३४३

इंद्रासी उद्वेग सर्वकाळ मनीं ॥ माझें पद कोणी घेइ नाकीं ॥ १ ॥ घेइना कीं कोणी बळिया दानव ॥ घालि नाकीं देव कारागृहीं ॥ २ ॥

कारागृहदेवादिकांचेंचुकेना॥तेथेंकायजनाचुकेईल॥३॥चुकेईल भोगहेंकईंघडावें॥लागेलभोगावेंकेलेंकर्म॥४॥केलेंकर्मतुटेज रीभ्रांतीफिटे॥दासह्मणेभेटेसंतजन॥५॥ ॥७॥ ॥

अभंग ३४४

लागलासेमुळींहादेहसंबंध॥करीतसेखेदअहंभावें॥१॥अहं-भावकदानाहींपुरवला॥भवभ्रमेंझाल्यादुःखराशी॥२॥दुःख राशीझाल्यादेहाच्यासंबंधें॥सर्वज्ञानबोधेंतुटतील॥३॥तुटनि-संबंधसंतांचेरहणी॥होईलझाडणीपंचभूतां॥४॥पंचभूतांल योस्वरूपींअन्वयो॥तुटलासंशयोसंबंधाचा॥५॥ ॥७॥

अभंग ३४५

महापापीलोकपूर्वींचआहेती॥तेचिपालटतीजयाचेनी॥१॥जया चेनियोगेंहोतसेउपाय॥तुटतीअपायनानाविध॥२॥नानाविधजन सुबुद्धचिहोती॥साधूचेसंगतींदासह्मणे॥३॥ ॥७॥ ॥

अभंग ३४६

ऐसाकेंचासंतजोदावीअनंत॥संदेहाचाघातकरूंजाणे॥१॥करूं जाणेसाधकाचेंसमाधान॥जयाभिन्नाभिन्नआटळेना॥२॥आट ळेनाजयाआपुलेंपारिखें॥ऐक्यरूपसुखेंसुखावला॥३॥सुखाच लाज्याचेसंगतींसाधक॥साधूतोचीएकधन्यजगीं॥४॥धन्यतेचि जगींजेगुणेंबोधिलें॥दासह्मणेगेलेपुरुषते॥५॥ ॥७॥ ॥

अभंग ३४७

संतांचेसंगतींरामपाठींलागे॥सांडूंजातामागेंसांडवेना॥१॥सांड वेनादेवसदासमागमीं॥बाह्यअंतर्यामीसारिखाचि॥२॥सारिखा चितीर्थींसारिखाचिक्षेत्रीं॥दिसाआणिरात्रींसारिखाचि॥३॥सा रिखाचिकडींकपारींशिखरीं॥गृहींवनांतरींसारिखाचि॥४॥सा-रिखाचिअंततोनाहींअनंत॥दासह्मणेकितमावळला॥५॥ ॥

अभंग ३४८

दुर्जनाचेसंगेंहोयमनोभंग॥सज्जनांचायोगसुखकारी॥१॥सुखका रीयोगसंतसज्जनांचा॥संतापमनींचादूरीठाके॥२॥दूरीठाकेदुः

खंहोयसर्वसुख ॥ पाहोंजातांशोक आढळेना ॥ ३ ॥ आढळेनालोभ तेथेंकैंचाक्षोभ ॥ अलभ्याचालाभसंतसंगें ॥ ४ ॥ संतसंगेंसुखरामींरा मदासीं ॥ देहसंबंधासीउरीनाहीं ॥ ५ ॥ ॥ ७ ॥ ॥

## अभंग ३४९

ब्रह्माविष्णूहरजयाचेअवतार ॥ तोचिदेवथोरजाणबापा ॥ १ ॥ जा- णबापादेवदेवांसिनिर्मिता ॥ तोदेवतत्वताठायींपाडी ॥ २ ॥ ठायीं पाडीदेवसंतांचेसंगतीं ॥ दासह्मणेगतीपावशील ॥ ३ ॥ ॥

## अभंग ३५० (आत्मनिवेदन)

आत्मनिवेदननववेंभजन ॥ येणेंसंतजनसमाधानी ॥ १ ॥ समाधा- नीसंतआत्मनिवेदनें ॥ ज्ञानेंमीतूंपणसांडियेलें ॥ २ ॥ सांडियेलेंसर्व मायीकसंगासी ॥ रामींरामदासींनिःसंगता ॥ ३ ॥ ॥ ॥

## अभंग ३५१

निःसंगताझालीविवेकानेंकेली ॥ मुक्तीहेलाधलीसायुज्यता ॥ १ ॥ सायुज्यतामुक्तीगुरुकृपाकरीतां ॥ श्रद्धावानहोतांपावनचि ॥ २ ॥ पा वनअसतांपतीतझालासी ॥ सोयचुकलासीपावनाची ॥ ३ ॥ पाव नाचीसोयधरितांअंतरीं ॥ स्वरूपविचारीसमाधानें ॥ ४ ॥ समाधा नझालेंपावनाचेंकेलें ॥ आत्मनिवेदीलेंदासह्मणे ॥ ५ ॥ ॥

## अभंग ३५२ (हरिभक्ती)

रामभक्तीवीणअन्यनाहींसार ॥ साराचेंहीसाररामनाम ॥ १ ॥ कल्प नाविस्तारुहोतसेसंहारु ॥ आह्मांकल्पतरूचाडनाहीं ॥ २ ॥ काम- नेलागुनिविरलेसेंमनु ॥ तेथेंकामधेनूकोणकाज ॥ ३ ॥ चिंतानाहीं मनींगातांरामगुणीं ॥ तेथेंचिंतामणीकोणपुसे ॥ ४ ॥ कदानाहींना शस्वरूपसुंदर ॥ तेथेंकायहिरेनाशवंत ॥ ५ ॥ रामदासह्मणेराम भक्तीवीण ॥ जाणावाहाशीणसर्वकांहीं ॥ ६ ॥ ॥ ७ ॥ ॥

## अभंग ३५३

सगुणाकरितांनिर्गुणपाविजे ॥ भक्तीवीणदुजेसारनाहीं ॥ १ ॥ सा राचेंहीसारज्ञानचिनिर्धार ॥ पाविजेसाचारभक्तीयोगें ॥ २ ॥ वेद शास्त्रींअर्थशोधूनीपाहिला ॥ तेथेंनिर्धारिलाभक्तिभाव ॥ ३ ॥ रा-

मींरामदासींभक्तीचमानली ॥ मनेंवस्तीकेलीराम पायीं ॥ ४ ॥ ॥

## अभंग ३५४

राघवाचीभक्तीज्ञानाचेंमंडण ॥ भक्तांचेंभूषणरामएक ॥ १ ॥ नलगे पिंडज्ञाननलगेतत्त्वज्ञान ॥ राघवाचेंध्यानआठवितां ॥ २ ॥ शब्दज्ञानपोथीवाचितांप्रबळें ॥ मागुतेंमाघळे क्षणएक ॥ ३ ॥ रामींरामदासींराघवाचीभक्ती ॥ तेथेंचारीमुक्तीओळंगती ॥ ४ ॥ ॥

## अभंग ३५५

कर्मेचित्तशुद्धीहोऊनियांगेली ॥ मगउपासिलीउपासना ॥ १ ॥ उपासनामिषेंदेवठायींपडे ॥ संदेहचिउडेएकसरा ॥ २ ॥ एकसरांपंथ-सांपडेसुगम ॥ जैसाविहंगमफळावरी ॥ ३ ॥ फळावरिझडज्जातांअनायासीं ॥ निर्फळअसोशीवायांचीण ॥ ४ ॥ वायांवीणशीणकासयाकरावा ॥ निर्फळजाणावासंसारहा ॥ ५ ॥ संसाराचासोसकामींनिजध्यास ॥ तेणेंजगदीशअंतरला ॥ ६ ॥ अंतरलादेवअंतरोनेदावा ॥ विवेकपाहावासज्जनांचा ॥ ७ ॥ सज्जनांचायोगसर्वांचावियोग ॥ अनित्याचात्यागचमत्कार ॥ ८ ॥ चमत्कारत्यागतत्वांचेविवरणें ॥ शीघ्रचिपावणेंमोक्षपद ॥ ९ ॥ मोक्षपदज्ञानरामदासींझालें ॥ बंधनतुटलेंसंसाराचें ॥ १० ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥

## अभंग ३५६

संगतीसज्जनकथानिरूपण ॥ सगुणेंनिर्गुणपाविजेतो ॥ १ ॥ सगु-णाचीभक्तीतेणेंहोयमुक्ती ॥ ऐसेंवेदश्रुतीबोलतसे ॥ २ ॥ भक्तीवीणज्ञानकदापाविजेना ॥ हेंवाक्यसज्जनांअंतरींचें ॥ ३ ॥ रामदास-ह्मणेसाराचेंहीसार ॥ सर्वांसीआधारभक्तीभाव ॥ ४ ॥ ॥

## अभंग ३५७

सोडीसंसाराचीआस ॥ धरीभक्तीचाहव्यास ॥ १ ॥ दुःखमूळहासंसार ॥ तयामध्येंभक्तीसार ॥ २ ॥ ग्रंथपाहालक्षकोटी ॥ जेथेंतेथेंभक्तीमोठी ॥ ३ ॥ जन्माआलियाचेंफळ ॥ दासह्मणेहेंसकळ ॥ ४ ॥

## अभंग ३५८

भक्तीरामाचीकरावी ॥ वंशावळीउद्धरावी ॥ १ ॥ तनुमनआणिध

न॥सर्वलोकीकसांडून॥२॥पांचापंचकाचाभार॥सर्वकाळअत्या
दूर॥३॥रामींरामदासह्मणे॥दृढभक्तीचेनिगुणें॥४॥ ॥

अभंग ३५९

रामदीनाचाकैवारी॥सेवकाचाअंगीकारी॥१॥अंगीकारिलेया
नर॥त्यांचीख्यातीझालीथोर॥२॥स्वयेंनिजधामाजाणें॥राज्य
करीबिभीषण॥३॥मजवैरकेलेंसाहे॥परीभक्तांचेनसाहे॥४॥
रामींरामदासह्मणे॥दृढभक्तीचेनिगुणें॥५॥ ॥छ॥ ॥

अभंग ३६०

पापपुण्यसमताघडे॥तरिचनरदेहजोडे॥१॥याचेंसार्थककरावें॥
आपणासिउद्धरावें॥२॥बहुजन्माचेशेवटीं॥नरदेहपुण्यकोटी॥
३॥रामदासह्मणेआतां॥पुढतीनलभेमागुता॥४॥ ॥

अभंग ३६१

देहआरोग्यचालतें॥भाग्यनाहींयापरतें॥१॥लाहोघ्यावाहरिभ
क्तीचा॥नाहींभरंवसादेहाचा॥२॥देहआहेक्षणभंगूर॥तुह्मी
जाणतांविचार॥३॥रामींरामदासह्मणे॥अकस्मातलागेजाणें ४

अभंग ३६२

देशकाळवर्त्तमान॥हातोंअवघाचिअनुमान॥१॥भक्तीकरावी
देवाची॥घडीजातीसोनियाची॥२॥काळवेळचिपाहातो॥सदा
सन्निधराहातो॥३॥रामींरामदासह्मणे॥देहआहेजाइजणें॥४॥

अभंग ३६३

पुढेंहोणारकळेना॥समाधानआकळेना॥१॥मनासावधानव्हावें
॥भजनदेवाचेंकरावें॥२॥ऋणानुबंधाचेंकारण॥कोठेंयेईलमर
ण॥३॥रामींरामदासह्मणे॥भजनेंअमरचिहोणें॥४॥ ॥

अभंग ३६४ (एकादशी)

एकादशीनव्हेव्रत॥वैकुंठीचामहापंथ॥१॥परीरुक्मांगदाऐसा॥
व्हावानिश्चयमानसा॥२॥एकदिवसउपोषणें॥विष्णुलोकींठावघे
णें॥३॥रामींरामदासह्मणे॥कायमत्यक्षप्रमाण॥४॥ ॥

अभंग ३६५

ज्यासी हरीची मासी व्हावी ॥ नेणें हरिदिनी करावी ॥ १ ॥ एके दिशीं त्य जिल्या अन्न ॥ लाभ वैकुंठ साधन ॥ २ ॥ रामीं रामदास ह्मणे ॥ हरि जाग रा सियेणें ॥ ३ ॥

अभंग ३६६

एकादशीच्या अन्ना खालीं ॥ जयें पान केलें पालीं ॥ १ ॥ कां जे संतीं अ द्धेरिलीं ॥ ह्मणुनि तेथें थिरावलीं ॥ २ ॥ विनवी रामीं रामदास ॥ घेउनी अंगीकारी त्यास ॥ ३ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥

अभंग ३६७ (औषध)

वैद्य भेटला सुखदाता ॥ रोगा पालट झाला आतां ॥ १ ॥ रस ओतिला का नांत ॥ येउनि शों बला नयनांत ॥ २ ॥ रस भिडला हाडसंधीं ॥ देह पा लट झाली बुद्धी ॥ ३ ॥ देह झाला दिव्य रस ॥ गुरुन्या हाळी रामदास ४

अभंग ३६८

शरिरीं आहे रामराज ॥ औषधाचें काय काज ॥ १ ॥ जो जो प्रयत्न रा मावीण ॥ तो तो दुःखासि कारण ॥ २ ॥ शंकराचें हळाहळ ॥ जेणें केलें सुशीतळ ॥ ३ ॥ आह्मा नोचिंतो रक्षिता ॥ रामदासींना हीं चिंता ४

अभंग ३६९ (झाडणी)

चहूं निगमींचें गूज ॥ कानीं फुंकीलें सहज ॥ १ ॥ प्राणी नेणें उमजला ॥ पाहे विचार आपुला ॥ २ ॥ नित्यानित्य सारासार ॥ केला विवेकें विचा र ॥ ३ ॥ संत असंता दाविलें ॥ अंतीं अनंता भाविलें ॥ ४ ॥ नाना सा- धनीं सायासीं ॥ दृढ केलें निश्चयासी ॥ ५ ॥ दास ह्मणे निरूपणीं ॥ गेली भूतांची झडपणी ॥ ६ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥

अभंग ३७०

कां हीं एक उमजलें ॥ पुन्हा संदेहीं पडलें ॥ १ ॥ ह्मणे मज खायादेणें ॥ मागें संदेह सांडुणें ॥ २ ॥ आलें मीपणा सरिसे ॥ मनीं विषय संतो षें ॥ ३ ॥ येणें निष्ठेसि सांडिलें ॥ मग आह्मीं झडपिलें ॥ ४ ॥ देहबुद्धी चें अज्ञान ॥ मागें संदेहाचें अन्न ॥ ५ ॥ रामदासीं उमजलें ॥ भूता पासूनि सोडिलें ॥ ६ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥

अभंग ३७१

पंचभूतांचें अज्ञान ॥ गेलें निःशेष निघोन ॥ १ ॥ ह्मणे येथें काय झा

लें ॥ जनकासयामिळाले ॥ २ ॥ मीनोआहेसावधान ॥ मजकांकेलें-बंधन ॥ ३ ॥ पूर्वस्मरणमजला ॥ भूतलागलेंजनाला ॥ ४ ॥ मीतोंवस्तुचिकेवळ ॥ वायांमिळालेंसकळ ॥ ५ ॥ रामीरामदासह्मणे ॥ संतकृपेचेनिगुणें ॥ ६ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥

## अभंग ३७२ (अंजन)

डोळाह्मगाळोनीसाधिलेंअंजन ॥ निजधनींधनमासझालें ॥ १ ॥ पायाळाचेंदिल्हेबळिदानअंग ॥ अंगींअंगसंगसंगावीण ॥ २ ॥ लाभनाअलाभवृत्तीनानिवृत्ती ॥ शुद्धबुद्धज्ञप्तीमावळली ॥ ३ ॥ आकाशाहरपलेंचिद्रूपसंचलें ॥ सूर्येवीणपाहिलेंसदोदिन ॥ ४ ॥ नादबिंदुकळाज्योतीविश्रामली ॥ रामदासीं झालीवस्तीतेथें ॥ ५ ॥ ॥

## अभंग ३७३ ("मूर्खस्यप्रतिमापूजा")

गळाबांधिलापाषाणीं ॥ आत्मलिंगनेणेंकोणी ॥ १ ॥ जीवशिवाचेंस्वरूप ॥ कोणजाणेकैसेंरूप ॥ २ ॥ लिंगचुकलास्वयंभ ॥ धरिलापाषाणाचाकोंभ ॥ ३ ॥ रामीरामदासह्मणे ॥ भेदजाणतीशाहाणे ॥ ४ ॥

## अभंग ३७४

एकवीसस्वर्गविस्तारला ॥ देवसंपुष्टींघातला ॥ १ ॥ केलेंदेवासिबंधन ॥ तेंचिपावलाआपण ॥ २ ॥ देवठायींचाअनंत ॥ त्यासिपाहेअंतवंत ॥ ३ ॥ रामदासह्मणेभावें ॥ जैसें घ्यावेंतैसेंघ्यावें ॥ ४ ॥

## अभंग ३७५

अंतनाहींतोअनंत ॥ त्यासीदोरीकरीभ्रांत ॥ १ ॥ ऐसेंजनांचेंकरणें ॥ कैसासंसारतरणें ॥ २ ॥ देवव्यापकसर्वांशी ॥ त्यासीह्मणतीएकदेशी ॥ ३ ॥ रामदासींदेवपूर्ण ॥ त्यासिह्मणतीअपूर्ण ॥ ४ ॥ ॥

## अभंग ३७६

देवपाषाणभाविला ॥ तोचिअंतरींदाविला ॥ १ ॥ जैसाभावअसेजेथें ॥ तैसादेववसेतेथें ॥ २ ॥ हृदयभावोनीयांगेला ॥ देवजाहलानिराळा ॥ ३ ॥ दासह्मणेभावातीत ॥ होतोमगरअनंत ॥ ४ ॥ ॥ छ ॥

## अभंग ३७७

अवघेंपाषांडमांडिलें ॥ लोकह्मणतीआपुलालें ॥ १ ॥ सर्वांघटींदेव

एक॥ देवभ्रा विलाअनेक॥ २॥ देवनिर्मळनिश्चळ॥ पाहातीपाषाणाचीखोळ॥ ३॥ रामदासाचेंअंतर॥ देवापाशीनिरंतर॥ ४॥ ॥

अभंग ३७८

ध्यानअवघेंचिदा किती॥ बळेंघेतीतोंडीमाती॥ १॥ देवसर्वांचेअंतरीं॥ सांडूंजानांनेंशीपरी॥ २॥ तूपसांडोनीआपण॥ खाचूंपाहे साठवण॥ ३॥ दासह्मणेतेंराउळ॥ सांडुनिपूजीतीदेउळ॥ ४॥

अभंग ३७९

साठवणेंवीणधान्य॥ धान्येंवीणसाठवण॥ १॥ एकावीणएककाय॥ कामानयेवायांजाय॥ २॥ ज्ञानावीणउपासना॥ उपासनेंवीणज्ञान॥ ३॥ रामींरामदासीं अन्न॥ करीनुस्तेंचिभोजन ४

अभंग ३८०

पडसादेशीकरीवाद॥ खळासवेंनोविवाद॥ १॥ तेथेंचालेनामीपण॥ शीणपावावेंआपण॥ २॥ व्यवधानासवेंजावें॥ प्रतिबिंबाशीं भांडावें॥ ३॥ रामदासह्मणेजीवें॥ समुद्राशीं गडुगडावें॥ ४॥ ॥

अभंग ३८१

बहुरत्नवसुंधरा॥ मायादेवीचाडांगोरा॥ १॥ त्यासिबोलतांसरेना॥ अवघेंआयुष्यपुरेना॥ २॥ नानाभेदनानामतें॥ बहुविध असंख्यातें॥ ३॥ दासह्मणेनानापरी॥ सृष्टीवर्नेजन्मवरी॥ ४॥

अभंग ३८२

सत्यबोलेंएकविध॥ तेथेंकेंचेंबहुविध॥ १॥ तेथेंकोणासिभांडावें॥ कोण्यापंथासिमांडावें॥ २॥ बहुयात्रापृथ्वीवरी॥ बहुशाब्दनानापरी॥ ३॥ नानाशब्दनानापुरे॥ दासह्मणेतींउत्तरें॥ ४॥

अभंग ३८३ (गाणें)

संसाराचेंदुःखझालें॥ गाणेंअवघेंचिबुडालें॥ १॥ आतांआठवेनाकांहीं॥ पडिलोंचिंतेच्याप्रवाहीं॥ २॥ गाणेंनाचणेंसुखाचें॥ जिणेंझालेंहेंदुःखाचें॥ ३॥ ह्मणेरामींरामदास॥ कोणकरितोसायास ४

अभंग ३८४

नानाप्रकारींचेंगाणें॥ मीचबाळपणींजाणें॥ १॥ कायझालेंतेंक-

ळेना ॥ एकतेंही आठवेना ॥ २ ॥ मजपाठांतर होतें ॥ इतुकें कोणासी नव्हतें ॥ ३ ॥ रामदास ह्मणे आतां ॥ जीव जाहला दुश्चिता ॥ ४ ॥ ॥

अभंग ३८५

आतां गाती नाना परी ॥ परी न ये माझी सरी ॥ १ ॥ माझें गाणें कोणी कडे ॥ काय गातील बापुडे ॥ २ ॥ आतां पहिला विसरू ॥ आठवेना काय करूं ॥ ३ ॥ दास ह्मणे भक्ती केंची ॥ ऐशी जाती अभिमानाची ॥ ४ ॥

अभंग ३८६

गाणें कांहींच येईना ॥ अभिमान हा जाईना ॥ १ ॥ आलें निकट मरण ॥ तरी सोडिना मीपण ॥ २ ॥ देह जाहला पंजर ॥ ह्मणे होतों मी सुंदर ॥ ३ ॥ रामदास ह्मणे रिते ॥ प्राणी अभिमान धरिते ॥ ४ ॥ ॥

अभंग ३८७ (गुरुशिष्य)

गुरु ह्मणे कांहीं देवो ॥ शिष्य ह्मणे मंत्र येवो ॥ १ ॥ करावया विषयार्चन ॥ पोसणें झालें ब्रह्मज्ञान ॥ २ ॥ गुरु दाउन दे उपदेश ॥ अनाचारकरी शिष्य ॥ ३ ॥ रामीं रामदास ह्मणे ॥ धिग्धिग् जळो त्याचें जिणें ४

अभंग ३८८

गुरु शब्दज्ञान काबाडी ॥ शिष्य विषयी बराडी ॥ १ ॥ हा नों मांडिला विनोद ॥ क्रियेंवीण शब्दबोध ॥ २ ॥ गुरू आस धरूनि बोले ॥ शिष्य वरपंगें डोले ॥ ३ ॥ कांहीं देतां आनंदावें ॥ रितें येतां कुसमुसावें ४ गुरु रागें फिरवी डोळे ॥ शिष्य त्यावरी चौताळे ॥ ५ ॥ शिष्य विषयीं बापुडें ॥ गुरु आस करी वेडें ॥ ६ ॥ आस सुटेना दोघाची ॥ तारं बळी परमार्थाची ॥ ७ ॥ रामीं रामदास ह्मणे ॥ इतुकीं लोभाचीं कारणें ८

अभंग ३८९ (करंटे)

मत्सराचे सुखें मत्सराचे गुणें ॥ लाभेंवीण भुनें भुंकतसे ॥ १ ॥ आपणगुंतलें विषयींके कनां ॥ सज्जनां भुंकनां पाठी लागे ॥ २ ॥ आशेचा टुकडा टाकितां लुडबुडी ॥ दास ह्मणे वेडी जात ऐशी ॥ ३ ॥ ॥

अभंग ३९०

श्वाना चिये पुन्हें कोल्हाळ मांडीला ॥ कलह लागला एकसरां ॥ १ ॥ भुंकतां भुंकतां वासित्ता तितोंड ॥ वरतीं थोबाड करूनियां ॥ २ ॥ एक

तेहांसती एकनेरडती ॥ निंदकांचीगती दासह्मणे ॥ ३ ॥ ॥ ७ ॥ ॥

## अभंग ३९१

कपटीकुटीळआळशी ॥ घरींमिळेनाखायाशी ॥ १ ॥ उगाचिधरीतसेता ठा ॥ पापीदरिद्रीकरंटा ॥ २ ॥ पोरेंह्मणतीकायखावें ॥ बाइलह्मणेकोठें-जावें ॥ ३ ॥ रामींरामदासह्मणे ॥ अवघींह्रांसतीपिसुणें ॥ ४ ॥ ॥

## अभंग ३९२ (देहभजन)

क्षुधालागतांचिअन्न ॥ तृषालागतांजीवन ॥ १ ॥ अवघाधंदाचिलागला ॥ दिसेंदिसकाळगेला ॥ २ ॥ निद्रायेतांचिशयन ॥ अळसयेतांचुकेंमन ३ मळमूत्रसंपादणें ॥ शौचआचमनकरणें ॥ ४ ॥ खाणेंलागेपरोपरीं ॥ सर्वकाळभरोंचरी ॥ ५ ॥ रामींरामदासह्मणे ॥ देहसुखाडाकारणें ॥ ६ ॥

## अभंग ३९३

ह्रातधुणेंपायधूणें ॥ नानाउपचारकरणें ॥ १ ॥ अवघाधंदाचिलागला ॥ दिसेंदिसकाळगेला ॥ २ ॥ सर्वकाळलोभसंग ॥ करणेंलागेह्रोअभ्यंग ॥ ३ ॥ वस्त्रालंकारपाहतां ॥ पुढतींघालितांकाढितां ॥ ४ ॥ रामदासह्मणे हित ॥ कैसेंघडावेंस्वहित ॥ ५ ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥

## अभंग ३९४

शीतकाळींनोहुतांश ॥ उष्णकाळींवारावास ॥ १ ॥ अवघाधंदाचिलाग ला ॥ दिसेंदिसकाळगेला ॥ २ ॥ आलेंपर्ज्जन्याचेदिवस ॥ केलेघराचेसायास ॥ ३ ॥ नानाव्याधींशीऔषधें ॥ पथ्यकरणेंनिरोधें ॥ ४ ॥ सदाइं-द्रियेंगळतां ॥ त्यांसिकरावीशुद्धता ॥ ५ ॥ दासह्मणेसांगोंकिती ॥ ऐशी देहाचीसंगती ॥ ६ ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥

## अभंग ३९५

धनधान्याचेंसंचित ॥ करणेंलागेसावचित्त ॥ १ ॥ अवघाधंदाचिलाग ला ॥ दिसेंदिसकाळगेला ॥ २ ॥ अर्थजातांएकसरें ॥ कलहोकरावाआदरें ॥ ३ ॥ नानापशूतेंपाळावें ॥ नानाभृत्यसांभाळावे ॥ ४ ॥ सर्वांसोयरींजतन ॥ करणेंलागेसावधान ॥ ५ ॥ रामदासह्मणेंदेवा ॥ जीयकिती हाघालावा ॥ ६ ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥ ॥

## अभंग ३९६

पोटधंदाजन्मवरी॥ करूंजातांनाहींउरी॥१॥ अवघाधंदाचिलागला॥ दिसेंदिसकाळगेला॥२॥ करितांसंसारींसायास॥ नाहींक्षणाचा अवका-
श॥३॥ अन्ननिर्माणकराया॥ सर्वकाळपीडेकाया॥४॥ कामकरितांदि
वसथोडा॥ याकष्टांसीनाहींजोडा॥५॥ दासह्मणेसावधान॥ झालेंसदृ
ढबंधन॥६॥

## अभंग ३९८ ( व्यर्थपंचक )

आतांसांभाळआपुला॥ पाहोंजातांकाळगेला॥१॥ आतांहितकोणेंवे
ळें॥ पुढेंहोणारनकळे॥२॥ देहालागीनानापरी॥ कष्टकेलेजन्मवरी ३
केलेंदेहाचेंभजन॥ परितेदेहझालेक्षीण॥४॥ देहालागीजीवेंभावें॥
वयवेंचिलेंअघवें॥५॥ ह्मणेरामींरामदास॥ केलाआयुष्याचानाश ६

## अभंग ३९९

वयझालेंवाताहात॥ अविचारेंकेलाघात॥१॥ देवनाहींओळखिला॥
पुढेंविषयदेखिला॥२॥ बाळपणींमूर्खपण॥ कांहींनेणेचिआपण॥३
॥ होतांतारुण्याचाभर॥ पुढेंझालाकामातुर॥४॥ वृद्धपणींसंकोचित
॥देहजाहलेंगळित॥५॥ रामींरामदासह्मणे॥ देहगेलामूर्खपणें॥६॥

## अभंग ४००

देहालागींकष्टकेले॥ परितेअवघेव्यर्थगेले॥१॥ देहदेवाचेकारणीं॥
लाचितांदेवहोतोऋणी॥२॥ प्राणीलोभेंगुंडाळला॥ पुढेंअंतकाळआ
ला॥३॥ जेंजेंकांहींकष्टकेले॥ तेतेअवघेव्यर्थगेले॥४॥ नानापरीसां
भाळिली॥ पुढेंकायाहेजाळिली॥५॥ दासह्मणेमूर्खपण॥ पुढेंजन्मा
सीकारण॥६॥

## अभंग ४०१

शतवर्षांचीमर्यादा॥ तितुकाव्यर्थगेलाधंदा॥१॥ देहसंसारींगोंवि-
ला॥ देवनाहींआठविला॥२॥ कायावाचामनोभावें॥ अवघेंप्रपंचींलावा
वें॥३॥ कांतापुत्रांचीसंगती॥ तेणेंमानिलीविश्रांती॥४॥ नीचसेवका
चेपरी॥ सेवाकेलीजन्मवरी॥५॥ दासह्मणेविषयगोडी॥ अंतकाळीं
कोणसोडी॥६॥

## अभंग ४०२

स्वार्थकेलाजन्मवरी॥ लोभेंराहिलाश्रीहरी॥१॥ धनधान्यअहर्निशीं
॥गायीह्मैसीघोडेदासी॥२॥ शेतवाडाघरठाव॥ प्राणीजीवींधरीहा
व॥३॥ मातापिताबहिणभ्राता॥ कन्यापुत्रआणिकांता॥४॥ त्याही

जांवाईआपुले॥ इष्टमित्रसुखीकेले॥५॥ दासह्मणेरेशेवटीं॥मासझा
लीमसणवटी॥६॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥

अभंग ४०४

जन्मवरीशीणकेला॥ अंतकाळीं व्यर्थगेला॥१॥घरवाडातोराहिला॥
प्राणीजातसेएकला॥२॥धनधान्यतेंराहिलें॥प्राणीचर्फडीतगेले३
इष्टमित्रआणिसांगाती॥आपुलाल्याघराजाती॥४॥दासह्मणेप्रा
णीमेले॥ कांहींसार्थकनाहींकेलें॥५॥ ॥ छ॥ ॥ छ ॥

अभंग ४०५ (मस्तावीकपंचक)

डोळेचिरीवचांगले॥वृद्धपणींसरक्या झाले॥१॥ओलेमातीचाभ
रंवसा॥ कायधरीसिमानसा॥२॥मुखरसाळचांगळें॥पुढेंअवघेंसुर
कुतलें॥३॥रम्यनासीकसरळें॥सर्वकाळपाणीगळे॥४॥कर्णभूष
णीसुंदर॥पुढेंजाहालेबधिर॥५॥बरवीदंतांचीपंगती॥परितेउन्म-
ळोनिपडती॥६॥बरवेकरआणिचरण॥परितेझालेनिःकारण॥७॥
अंगकांतीहोतीबरी॥ झालीचिर्गुटाचेपरी॥८॥केशहोत्तातीपांढरे
॥लाळगळतांनधरे॥९॥बहुसालहोतेंबळ॥पुढेंजाहलेंनिर्बळ॥१०॥
देहहोतेजेनिर्मळ॥ तेचिजाहलेओंगळ॥११॥गर्वतारुण्याचागेला॥
प्राणीदीनरूपझाला॥१२॥रामींरामदासह्मणे॥आतांसावधानहोणें१३

अभंग ४०६

थोटेपांगुळबधिर॥अंधपंगूहोतीनर॥१॥नाहींदेहाचाभर्वसा॥शरण
जाईजगदीशा॥२॥एकप्राणीअंधहोती॥एकासमंधलागती॥३॥
नानारोगांचेउमाळे॥कायहोइलतेंनकळे॥४॥रामदासह्मणेआवें॥
वेगींसार्थककरावें॥५॥ ॥ छ॥ ॥ छ ॥ ॥ छ॥ ॥

अभंग ४०७

वेगींहोईसावधान॥ऐसेंआहेवृद्धपण॥१॥डोळेजातीकानजाती॥दं
तअवघेचिपडती॥२॥हातगेलेपायगेले॥देहापाझरलागले॥३॥दा
सह्मणेशक्तीगेली॥मतीअवघीचबुडाली॥४॥ ॥ छ॥ ॥

अभंग ४०८

ऐसेंआहे [illegible] कांहीं॥चिरंजीवकांहींनाहीं॥१॥मुक्तीजातेंबुद्धीजा

ते॥ क्रियातेहीपालटते॥२॥धीरविचारबुडाला॥विवेकहोतानोही-
गेला॥३॥रामीरामदासह्मणे॥वृद्धपणाचीलक्षणें॥ ४॥ ॥छ॥

## अभंग ४०९

अंतींएकलेंचिजावें॥ह्मणुनिराघवींभजावें॥१॥मातापिताबंधूज
न॥कन्यापुत्रहींसांडून॥२॥जन्मवरीकेलाभार॥सर्वीसांडूनिजोजा
र॥३॥ह्मणेरामीरामदास॥सर्वसांडूनियांआस॥४॥ ॥छ॥

## अभंग ४१० (मस्तावीकपंचक)

काळजातोक्षणक्षणा॥मूळयेईलमरणा॥१॥कांहींधांवाधांवक
री॥जंवतोकाळआहेदूरी॥२॥देहआहेजाईजणे॥भूललासिको
ण्यागुणें॥३॥मायाजाळींगुंतलेंमन॥परिहेंदुःखाशीकारण॥४॥
सत्यवाटतेंसकळ॥परिहेंजातांनाहींवेळ॥५॥रामीरामदासह्मणे॥
आतांसावधानहोणें॥६॥ ॥छ॥ ॥छ॥ ॥छ॥

## अभंग ४११

झालेंदेहहेंगळित॥आलेंसंसारलळित॥१॥सावधानसावधान॥
पुढेंनाहींव्यवधान॥२॥आतांमनआटोपावें॥आपुल्यानिजधामा
जावें॥३॥राहेदेवाच्यास्मरणें॥रामीरामदासह्मणे॥४॥ ॥छ॥

## अभंग ४१२

पुण्यपाहाण्याकारणें॥देवधाडीबोलावणें॥१॥वाटलागतेधरावी॥
पुण्यसामग्रीकरावी॥२॥वाटवेंचनाहींजया॥पुढेंसुखकेंचेंतया२
रामीरामदासह्मणे॥बुद्धीवंततेशाहाणें॥४॥ ॥छ॥ ॥

## अभंग ४१३

अंतकाळयेतांयेतां॥तेथेंनयेचुकवितां॥१॥अकस्मातलागेंजावें॥
कांहींपुण्यआचरावें॥२॥पुण्येंवीणजातांप्राणी॥घडेयमाचीजाच
णी॥३॥रामदासह्मणेजना॥कठिणयमाचीयातना॥४॥ ॥

## अभंग ४१४

नाहींपुण्याचीगांठोडी॥तरितोयमडोईफोडी॥१॥तेव्हांमगपस्ता-
वाघडे॥प्राणीपाहेचहूंकडे॥२॥तसभूमीलोळविती॥अंगींसांडसला
विती॥३॥दासह्मणेहेंसकळ॥केल्यासंचिताचेंफळ॥४॥ ॥

## अभंग ४१५ (देह अपवित्र)

शौच केलें तेणें शुचिर्भूत झाला ॥ जळस्नानें केला मळत्याग ॥ १ ॥ मळत्या गें झालें शरीर निर्मळ ॥ अंतरींचा मळ कैसा जातो ॥ २ ॥ कैसा जातो काम क्रोध लोभ दंभ ॥ नांदती स्वयंभ अंतर्यामीं ॥ ३ ॥ अंतर्यामीं आधीं होइ जे निर्मळ ॥ तेणें तुटे मूळ संसाराचें ॥ ४ ॥ संसाराचें मूळ सूक्ष्मीं गुंतलें ॥ मन गुंडाळलें विभ्रमासी ॥ ५ ॥ विभ्रमासी बरें शोधूनि पाहावें ॥ अंतरीं राहावें निष्ठावंत ॥ ६ ॥ निष्ठावंत ज्ञानपूर्ण समाधान ॥ मग संध्यास्नान सफळित ॥ ७ ॥ सफळित संध्या संदेह नसतां ॥ निःसंदेह होतां समाधान ॥ ८ ॥ समाधान नाहीं स्नान संध्या काई ॥ लौकिकाचा ठायीं लोकलाज ९ लोकलाजे सर्व लौकिक चिकेला ॥ देव दुराविला वरपंगें ॥ १० ॥ वरपंगें देव कदा सांपडेना ॥ निष्ठेचा घडेना भक्तिभाव ॥ ११ ॥ भक्तीने भावेंची भाव तो जायाचा ॥ कर्म लौकिकाचा खटाटोप ॥ १२ ॥ खटाटोपें देव कदा पाविजेना ॥ निश्चयो घडेना शाश्वताचा ॥ १३ ॥ शाश्वताचा शोध अंतरीं नसतां ॥ सर्व ही पाहातां निरर्थक ॥ १४ ॥ निरर्थक तीर्थें निरर्थक व्रतें ॥ दास म्हणे जेथें ज्ञान नाहीं ॥ १५ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥

## अभंग ४१६

अस्थीचा विटाळ होतां स्नान केलें ॥ चुळें धूत गेलें कासयासी ॥ १ ॥ आचमन करावें शूद्राच्या विटाळें ॥ हाटाचे चोंढाळे कोण जाणे ॥ २ ॥ नदीचे मवाळीं अंत पाहों नये ॥ स्नान संध्या होय अग्रोदक ॥ ३ ॥ ओलें चर्म धूत होत आहे हिंग ॥ स्वयंपाकीं सांग सेविताती ॥ ४ ॥ रामदास म्हणे हें कोणही न पाहे ॥ देहमूळीं आहे विटाळाचा ॥ ५ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥

## अभंग ४१७

विटाळाचे देहीं विटाळ वाढला ॥ तुवां शुद्ध केला कोणें परी ॥ १ ॥ पातकाच्या देहीं पातक जाहालें ॥ विचारितां आलें प्रत्ययासी ॥ २ ॥ अस्थींचा पंजर चर्में गुंडाळिला ॥ विष्टेनें भरला मळमूत्र ॥ ३ ॥ जंत कीडे ओक आतडीं कांतडीं ॥ बा [illegible] हाडकें वेडीं भादरीती ॥ ४ ॥ भादरीले केश मागुते निघती ॥ पुन्हा [illegible] भादरीतो गे ॥ ५ ॥ भादरीली डोई पळाला विटाळ ॥ मागुतां चांडा [illegible] भादरिली डोई घेतलें प्रायश्चित्त ॥

अपानीं घांसितमृत्तिकेनें ।। ७ ।। बराशुद्धकेलापुन्हापापीझाला ।। पुन्हाआदरिलासावकाश ।। ८ ।। सावकाशकांहींविचारपाहावा ।। जेणेंकरितांदेवापाविजेतें ।। ९ ।। पाविजेतेदेवाभक्तीनिवेदन ।। शुद्धब्रह्मज्ञानरामदासीं ।। १० ।।

## अभंग ४१८

विटाळाच्यादेहीं विटाळजाणतां ।। शुद्धकरूंजातांकोणेंपरी ।। १ ।। कोणेंपरीआतांहाशुद्धहोईल ।। विटाळजाईलकैसायाचा ।। २ ।। याचाअर्थघेतांयानयेशुद्धता ।। शुद्धकरूंजातांपुन्हापापी ।। ३ ।। पुन्हापापीझालेंपुन्हाशुद्धकेलें ।। आयुष्यवेंचलेंऐशापरी ।। ४ ।। ऐशापरीदेहसर्वदामुंडिला ।। दासह्मणेझालाकासावीस ।। ५ ।। ।। छ ।। ।। छ ।। ।।

## अभंग ४१९

मृत्तिकेनेंशौचकरीनानापरी ।। मागुतांशरीरनर्कतेथें ।। १ ।। नर्कतेथेंआहेतोकैसाकाढावा ।। व्यर्थवादवावालोकाचार ।। २ ।। लोकाचारकेलालोकिकादेखतां ।। अंतरींशुद्धताआढळेना ।। ३ ।। आढळेनाज्ञानपूर्णसमाधान ।। सर्वदाबंधनसंदेहाचें ।। ४ ।। संदेहाचेंपापझालेंवज्रलेप ।। विचारेंनिःपापरामदासीं ।। ५ ।। ।। छ ।। ।। छ ।। ।। छ ।।

## अभंग ४२० (तीर्थविधी)

अंतरींगुरुवचन ।। बाह्यनापीकवपन ।। १ ।। अंतर्बाह्यशुद्धझालों ।। रामदर्शनेंनिवालों ।। २ ।। मनमुंडिल्याउन्मनझालें ।। शिरमुंडिल्याकायकेलें ।। ३ ।। दासेंतीर्थविधीकेला ।। रामींपिंडसमर्पिला ।। ४ ।। ।। छ ।।

## अभंग ४२१

देहविटाळाचागोळा ।। कैसाहोतोशिसोंवळा ।। १ ।। तुजकळेनाविचारु ।। ऐशियासीकायकरूं ।। २ ।। दृढकेलाअभिमान ।। तेणेंसाधनतेंबंधन ।। ३ ।। रामदासस्वामीवीण ।। केलानितुकाहीशीण ।। ४ ।। ।। छ ।।

## अभंग ४२२ (शिमगा)

मातेचियापोटींगर्भसंभवला ।। शिमगाजाहलातेधवांची ।। १ ।। ओकनर्कमूतसेविलाबहुत ।। शिमगाअद्भुतखेळझाला ।। २ ।। खेळफारझालाजीवकंटाळला ।। मगधांवाकेलादेवाजी[illegible] ३ ।। देवरायामज-काढावेंयेथूनी ।। अंतरजाणोनीचुक[illegible]ऽविलेंमजदाविले

चरण॥ सेवेसी संपूर्ण लावियेलें॥ ५॥ लावियेलें मज मूढ अभाग्यासी ॥ कैवल्यभाग्यासी पाचवीलें॥ ६॥ पाचविलें उंची आतां न येनी ची॥ चीची शिमग्याची आवडे ना॥ ७॥ आवडे ना राखमाती शेणकाला॥ बरें मन घाला तयामध्यें॥ ८॥ तयामध्यें बरें कांहीं आढळेना॥ खेळन येम नाह्मणो नियां॥ ९॥ ह्मणो नियां बोंब नेहीमारूनपे॥ अपशब्द का यउच्चारूनी॥ १०॥ उच्चारितां होय पापाची सामग्री॥ पुण्याची बोहरी होयतेणें॥ ११॥ होयतेणें यमयातना अनेक॥ चुकवावा नर्कनानायलें १२ नानायलें पुन्हा पाप मचि जोडावें॥ मागुतें बुडावें अधःपातीं॥ १३॥ अधःपात चुके देवाचे स्मरणें॥ टाळी वाजवणें नामघोषें॥ १४॥ नामघोषें टाळी वाजवणे थोर॥ किंवा बोंब थोर विचारणें॥ १५॥ विचारणें सर्व आपुलें स्वहित॥ देह अशाश्वत पाहा तुह्मी॥ १६॥ पाहा तुह्मी काळमारील चपेटा॥ ते व्हां चा रावा टा संसाराच्या॥ १७॥ संसाराच्या वाटा त्यां सर्व अव्हाटा॥ धरा पंथ मोठा भजनाचा॥ १८॥ भजनाचा पंथ अत्यंत सुगम॥ नवविधा नेम सार आहे॥ १९॥ सार आहे नेम अगत्य धरणें॥ शिवरा मह्मणे तराचया॥ २०॥ ॥ छ॥ ॥ छ॥ ॥ छ॥ ॥

## अभंग ४२३ (होळी)

अवघे चि बोंबलती॥ होळी भोवतें भोंवति॥ १॥ माया होळी मज्वळी॥ सृष्टि वेढा याला विली॥ २॥ ज्याकारणें गुंडाळती॥ तें चि वाचे उच्चारिती॥ ३॥ होळीमध्यें खाजें आहे॥ तें तूं विचारूनि पाहे॥ ४॥ खाजें खातां सुख होय॥ परि तें कठिण हातां नये॥ ५॥ खोल दृष्टीनें पाहिलें॥ खाजें त्याच्या हातीं आलें॥ ६॥ एक झडा घालूं जाती॥ लंडी चकचकूनि पडती ७ एक देहाचे पांगिले॥ ते चि अंगें हुर्पळले॥ ८॥ उडी अवघ्याची चपडे॥ परि तें हाता सी न चढे॥ ९॥ एकें थोर धिवसा केला॥ खाजे घेऊनी पळाला॥ १०॥ एक आपण चि खाती॥ एक सकळांशी वाटिती॥ ११॥ एक घेउनी पळाले॥ परि ते कवठीवर पडे झाले॥ १२॥ रामीं रामदासीं होळी॥ केली संसाराची धूळी॥ १३॥ ॥ छ॥ ॥ छ॥ ॥ छ॥ ॥

## अभंग ४२४

असुनि कार्य दु... ...अवधान होई आतां॥ १॥ नाग विलें यो निद्रा

रें॥ म्हणुनिवोंबलतीपोरें॥२॥सकळनाडिपेलेंयांझे॥अवघीएकचि वोंवगाजे॥३॥धुळीटाकितीमस्तकीं॥कोणीदाददेईनाकीं॥४॥रा- डीऐसेनर्कहोती॥म्हणुनिप्रत्यक्षदाविती॥५॥झोंबीलोंबीहेंघेऊनी॥ जातीटाकितीनेऊनी॥६॥नयेनयेहेंम्हणती॥बळेंचिपाताळींघालिती ॥७॥धरुनिअकस्माननेती॥अवघींकौतुकेंपाहाती॥८॥तेथेंअसेना मर्यादा॥थोरकरितातीआपदा॥९॥घरोघरींफेरेकरिती॥तेशाहोती पुनरावृत्ती॥१०॥रामदाससांगेखूण॥जावेंसंतांशीशरण॥११॥ ॥

## अभंग ४२५ (करंटलक्षण)

वासनेचीकुडीकुबुद्धीचांकुडी॥वाचेहुडहुडीममतेची॥१॥वैराग्या- चावन्हीविझोनियांगेला॥संचीतखायाला पुण्यनाहीं॥२॥भक्तीपांघ रुणहेंमाझेंझडलें॥मजओसंडिलेंसंतजनीं॥३॥नामसंजीवनींमुखीं नाहींवाणी॥निंदेचीपोहणीमवळली॥४॥रामदासम्हणेऐशियांचें- जिणें॥सदादैन्यवाणेंरामेंवीण॥५॥ ॥७॥ ॥७॥ ॥

## अभंग ४२६

लोभाचेबराडीकामांघालीउडी॥पायांचींवेंगडीवळतसे॥१॥सदाभ क्तीवीणझालेंउपोषण॥झडघालीअन्नखावयाशीं॥२॥मायाजाळ अंगींसुटलेंअंतरीं॥परघरींचोरीकरीतसे॥३॥आंगहेंचोरितांआंग चिखुजलें॥नाहींबुझाविलेंरामालागीं॥४॥रामदासम्हणेप्राणीभक्ती वीण॥तयालागीशून्यआदळेना॥५॥ ॥७॥ ॥ ७ ॥

## अभंग ४२७ (विवेक)

भयानकस्वप्नजयावाटेभय॥तेणेंनिजोनयेसर्वकाळ॥१॥सर्वकाळजा गाविवेकासंगतीं॥तयासीकल्पांतींभयनाहीं॥२॥भयउठेदेहीं तूंतंव विदेही॥देहातीतपाहीआपणासी॥३॥आपणानेणतांभयवाटेचि- न्ता॥ म्हणोनिदुश्चिताराहूंनको॥४॥राहूंनकोकदायादेहसंबंधीं॥म नींधरीशुद्धीस्वरूपाची॥५॥स्वरूपाचीशुद्धीजयाठायींपडे॥तयानरा घडेसमाधान॥६॥समाधानघडेदेहनाठवितां॥रामदासींचिंतादूरठेली ॥७॥

## अभंग ४२८

दर्पणींपाहातांदिसतेंसर्वांग॥परिपूर्णभाग ॥१॥आपुलीच

पाठीआपणानदिसे॥ऐसेंबोलतसेसर्वजन॥२॥आपशब्दीनेणें त्याकायपरावें॥म्हणोनीजाणावेंआपणासी॥३॥आपणासिजा-णेंसंतांचेसंगती॥तयांअधोगतीजन्मनाहीं॥४॥नाहींजन्ममृत्युना-हीयेणेंजाणें॥स्वरूपींराहाणेंदासह्मणे॥५॥

## अभंग ४२९

सरस्वतीविद्यालक्ष्मीअविद्या॥देहातीतआद्याचेंस्वरूप॥१॥स्वरूपीं लक्ष्मीनाहींसरस्वती॥संपत्तीविपत्तीदोनीनाहीं॥२॥नाहींशिवशा-क्तीनाहींनरनारी॥अंतरींविचारीदासह्मणे॥३॥

## अभंग ४३०

मनहेंविवेकेंविशाळकरावें॥मगआठवावेंपरब्रह्म॥१॥परब्रह्मम-नींतरीचनिवळे॥जरीबोधेंगळेअहंकार॥२॥अहंकारगळेसंताचेसं गती॥मगआदिअंतींसमाधान॥३॥समाधानघडेस्वरूपींराहतां॥ विवेकपाहतांनिःसंगाचा॥४॥निःसंगाचासंगसदृढधरावा॥संसार तरावादासह्मणे॥५॥

## अभंग ४३१ श्रवणमनन.

नमूंवेदमाताजेकासर्वसत्ता॥ब्रह्मज्ञानआतांबोलूंकांहीं॥१॥बोलूं कांहींब्रह्मजेणेंतुटेभ्रम॥आणिमुख्यवर्मठायींपडे॥२॥ठायींपडेदे वआणिभावाभाव॥प्रकृतीस्वभावसर्वकांहीं॥३॥सर्वकांहींकळेसं देहभावळे॥अंतरनिवळेसाधकाचें॥४॥साधकाचेंहीनहोयनिरूप-णें॥श्रवणमननेंदासह्मणे॥५॥

## अभंग ४३२

सर्वांहूनीथोरदेवनिराकार॥मगहाविस्तारविस्तारला॥१॥विस्तार-लाजनहानानापरींचा॥निर्गुणपूर्वींचादेवआहे॥२॥देवआहेसत्य येरहेंअसत्य॥जाणनित्यानित्यविचारणा॥३॥विचारणाकरीधुंडी नानापरी॥दास [illegible]नरशील॥४॥

## अभंग ४३३ देवाचा निश्चय.

तुह्मींअह्मींकरूं [illegible]निश्चय॥जयानाहींलयतोचिदेव॥१॥देवहा अमरनित्यनिरं[illegible]पूनिअंतरदेवआहे॥२॥देवआहेसदासबा

त्यअंतरीं॥जीवाक्षणभरीविसंबेना॥३॥विसंबेनापरीजीवासिने-
णवे॥ह्मणोनीयांधांवेनानामतीं॥४॥नानामतींदेवपाहातांदिसेना॥
जंवनेंवसेनाज्ञानदेहीं॥५॥ज्ञानदेहींवसेतयादेवदिसे॥अंतरींप्र-
काशेज्ञानदृष्टी॥६॥ज्ञानदृष्टीहोतांपाविजेअनंता॥हाशब्दतत्वतां
दासह्मणे॥७॥

## अभंग ४३४

पतीतह्मणजेवेगळापडला॥पावनतोझालाएकरूप॥१॥एकरूप
देवअरूपठायींचा॥तेथेंदुजाकेंचाकोणआहे॥२॥कोणआहेदुजा-
स्वरूपींपाहतां॥विचारेंराहतांसरवआहे॥३॥सरवआहेमूळआपु
लेंशोधितां॥मानसींबोधितांरामदास॥४॥

## अभंग ४३५

ऐसाकोणआहेमुक्तियाचाजाण॥कळेओळखणनसांगतां॥१॥न
सांगतांजाणेअंतरींचाहेत॥पुरवीआरतसर्वकांहीं॥२॥सर्वकांहीं
जाणेचतुरांचाराणा॥धन्यनारायणालीलातुझी॥३॥तुझीलीला
जाणेऐसाकोणआहे॥विरिंचीतोराहेचाकाटला॥४॥चाकाटलामनू
देवासिपाहतां॥दासह्मणेआतांहदझाली॥५॥

## अभंग ४३६

गीताभागवतींउपदेशकेला॥अर्जुनादाविलादेवकृष्णें॥१॥कृष्णें
दाखविलादेवतोवेगळा॥बोलिजेआगळासर्वांहूनीं॥२॥सर्वांहू-
नीसारदेवतोसाचार॥दासह्मणेपारनकळेत्याचा॥३॥

## अभंग ४३७

कल्पनेचादेवकल्पनेचीपूजा॥तेथेंकोणीदुजाआढळेना॥१॥आ
ढळेनादेवआढळेनाभक्त ॥कल्पनेविरहितकायआहे॥२॥आहे
तैसेंआहेकल्पनानसाहे॥दासह्मणेपाहेअनुभव॥३॥

## अभंग ४३८

भावनेचादेवभावार्थेंभाविला॥देवभक्तझालेजयाठायींचा॥१॥भावने
चादेवभावनेचाभक्त॥भावनेचामुक्तभावीतसे॥२॥रामदासभाविनसेमन-
त्याहूनीअभिन्न॥दासह्मणेज्ञानेंओळखावें॥३॥ ॥७॥ ७

अभंग ४३९

विषयरूदनसोडुनीयांयावें॥त्यांनिजींनिजावेंसंतसंगें॥१॥संता चेसंगतीहोइरेनिश्चळ॥मगतळमळविसरशी॥२॥विसरशीदुःख संताचेसंगती॥चुके अधोगतीगर्भवास॥३॥गर्भवासआतांचुक वीआपुले॥धरावींपाउलेंराघवाचीं॥४॥राघवाचेभक्तराघवींमि ळती॥भेटेसीतापतीदासह्मणे॥५॥

अभंग ४४०

धाकुटाचीधुरूतेंनव्हेलेंकरूं॥जयासर्वेश्वरूप्रगटला॥१॥प्रगटला देवतयाउपमन्या॥भावार्थेआंदण्याक्षीरसिंधू॥२॥क्षीरसिंधूवासी स्वयेंनारायण॥प्रल्हादारक्षणकरीतसे॥३॥करीतोरक्षणदासाचें- संकटीं॥त्याचेंनामकंठींअसोंद्यावें॥४॥असोंद्यावेंवाचेदेवाचेंचिंत न॥गजेंद्रापावननामघेतां॥५॥

अभंग ४४१

आपुल्यादेवाचीवाटचुकलाशी॥ह्मणोनीआलाशिसंसाराशी॥१॥ संसाराचेदुःखंकरिशीरुदन॥चुकलेंभजनराघवाचें॥२॥राघवाची भक्तिनेणतांविपत्ति॥तुजअधोगतीजन्मझाला॥३॥जन्मझालापरी वेगेंसोयधरी॥सत्वरसंसारींमोकळीक॥४॥मोकळीकहोयभक्तिपं थेंजातां॥हेंवाक्यतत्वतांदासह्मणे॥५॥

अभंग ४४२.

माझेमनींसर्वसुखव्हावेंतुज॥म्हणोनीयांगुजसांगतसे॥१॥सांग- तसेहीतत्वांजीवींधरावें॥भजनकरावेंराघवाचें॥२॥राघवाचेंप्रेम जेंकरीविश्राम॥येरसर्वश्रमजाणबापा॥३॥जाणबावचनहेंमाझें प्रमाण॥वाह्यातसेआणराघवाची॥४॥राघवाचीभक्तिनेमाझीवि श्रांती॥असोंद्यावीचित्तींदासम्हणे॥५॥

अभंग ४४३

ब्रम्हाविष्णुहरजयाचेअवतार॥तोचिदेवथोरजाणबापा॥१॥जाण बापादेवदेवांसिनिर्मिता॥तोचिबातत्वतांठायींपाडी॥२॥ठायींपा डीदेवसंताचेरुं 'दासम्हणेगत्तीपावशील॥३॥ ॥७॥ ५

## अभंग ४४४

नवसपुरवीतोदेवपूजीयेला॥लोभालागींझालाकासावीस १॥कासावीस झालाप्रपंच्याकरितां॥सर्वकाळचिंताप्रपंचाची॥२॥प्रपंचाचीचिंताकरि तांचीमेला॥तोकायदेवालाउपकार॥३॥उपकारकेलासर्वज्यांलागूनी॥तीं गेलींमरोनीपाहातसे॥४॥पाहातसेपुढेंआपणहिमेला॥देवासिचुकलादास ह्मणे॥५॥

## अभंग ४४५ चत्वारदेव.

लोभेंनवसाचातोदेवब्राह्मणाचा॥आणिमुमुक्षूचागुरुदेव॥गुरुदेवजाणतया मुमुक्षूचा॥देवसाधकाचानिरंजन॥२॥निरंजनदेवसाधकाचेमनीं॥सिद्ध समाधानींदेवरूप॥३॥देवरूपझालासंदेहतुटला॥तोचिएकभलाभूमंड ळीं॥४॥भूमंडळींरामदासधन्यआहे॥अनन्यतापाहेशोधूनियां॥५॥ ७

## अभंग ४४६

योगियांचादेवमजसांपडला॥थोरलाभझालाएकाएकीं॥१॥एकाएकीं एकत्रैलोक्यनायक॥देखिलासन्मुखचहूंकडे॥२॥चहूंकडेरामनित्यनिरं तर॥व्यापिलेंअंतरसमागमें॥३॥समागमेंआत्मारामचिजोडला॥वियोग ह्याकेलादेशधडी॥४॥देशधडीकेलाविकल्पवियोग॥रामदासीयोगसर्वकाळ५

## अभंग ४४७

नकरितांभजनहोईलनर्जन॥तेथेंकोणजनसोडवील॥१॥सोडवीलदेव अनाथाचानाथ॥तोएकसमर्थमनींधरा॥२॥मनींधरागोष्टीआपुल्याहि ताची॥भक्तिस्वहीताचीदासह्मणे॥३॥

## अभंग ४४८

धन्यमाझेंभाग्यझालेंसफळित॥देवसप्रचीतजेथेंतेथें॥१॥जेथेंतेथेंदेव येरसर्वभाव॥माझाअंतर्भावनिवळला॥२॥निवळलाभावनिर्गुणींलाग तां॥विवेकजाणतांनित्यानित्य॥३॥नित्यानित्यबरेंशोधूनीपाहीलें॥मनहें राहिलेंसमाधानें४समाधानेंमनजाहालेंउन्मन॥शब्दब्रह्मज्ञानरामदासीं ५

## अभंग ४४९

देखिलासंसारतरीपाहेसार॥वायांबेव्झारपाडूंनको॥१॥पाडूंनकोदुःख सागरींआपणा॥वेगींनारायणाओळखावें॥२॥ओळखावेंवेगींआप आपणासी॥संसारींदशीदासह्मणे॥३॥ ॥७॥ ७

## अभंग ४५०

ज्याचेंनामघेशीतेंचितूंआहेसी॥पाहेआपणासीशोधूनियां॥१॥शोधितांशो धितांमीपणचिनाहीं॥मीपणाचेंपाहींमूळबरें॥२॥मूळबरेंपाहानसोनी- यांराहा॥आहातेंसेंआहासर्वगत॥३॥सर्वगतआत्मातोचितोपरमात्मा॥ दासअहंआत्मासांगतसे॥४॥

## अभंग ४५१

सोहंहंसाह्मणिजेतोमीतोमीऐसें॥हेंवाक्यविश्वासेंविवरावें॥१॥विवरावें अहंब्रह्मास्मीवचन॥ब्रह्मसनातनतूंचीएक॥२॥तूंचिएकब्रह्महेंचिमहावा क्य॥परब्रह्मऐक्यअर्थबोधें॥३॥

## अभंग ४५२

ध्यानकरूंजातांमनहरपलें॥सगुणजाहालेंगुणातीत॥१॥जेथेंपाहेतेथेंराघो बाचेंठाण॥करींचापबाणशोभतसे॥२॥रामरूपींदृष्टीजाऊनीबैसली॥स स्वींसुखावलीन्याहाळितां॥३॥रामदासह्मणेलाचावलेंमन॥जेथेंतेथेंध्यान दिसतसे॥४॥

## अभंग ४५३

धन्यधन्यतेवान्नर॥जवळीरामनिरंतर॥१॥ब्रह्मादिकांनातुडेध्यानीं॥तो हावान्नरांगोठणीं॥२॥वेदश्रुतीसीनकळेमहिमा॥गुजसांगेप्लवंगमा॥३॥दा सह्मणेतेदैवाचे॥आवडनेरघुनाथाचे॥४॥

## अभंग ४५४

एकलक्षतोदिनमणी॥तृसहोनसेकमळीणी॥१॥तैसादेवआहेदूरी॥परी- तोभक्तांच्येअंतरीं॥२॥दोनीलक्षनिशापती॥परीतेचकोरतृसहोती॥३॥रा मदासह्मणेघन॥देतोचातकाजीवन॥४॥

## अभंग ४५५

बाळपणींलोपकरी॥मातानाहींजन्मवरी॥१॥देवदिनाचादयाळ॥दासपा ळसर्वकाळ॥२॥चंद्रसूर्यमावळती॥घनआकाशींलोपती॥३॥रामींराम- दासींभाव॥तैसानव्हेदेवराव॥४॥

## अभंग ४५६

मायबापेंसांभाळिती॥लोभाकारणेंपाळिती१तैसानव्हेदेवराव॥त्याचाकृ पाळूस्वभाव॥२॥म रिखेंनहोतां॥बाळकासमारीमाता॥३॥दासह्म

णेसांगोंकिती ॥ बापलेंकासिमारिती ॥ ४ ॥

## अभंग ४५७

एकसहस्त्रकोटीवरी ॥ झालीअन्यायांचीभरी ॥ १ ॥ नरीदेवउपेक्षीना ॥ अंतींनि ष्ठुरकरिना ॥ २ ॥ शरणागतभांबावले ॥ भजनदेवाचेंचुकले ॥ ३ ॥ रामीरामदा- सह्मणे ॥ सर्वगुणेंभक्तउणे ॥ ४ ॥

## अभंग ४५८

देवअभक्तांचोरला ॥ आह्मांभक्तांसांपडला ॥ १ ॥ भेटीझालीसावकाश ॥ भ क्तांनलगनांसायास ॥ २ ॥ पुढेंविवेकवेत्रपाणी ॥ वारीदृश्याचीदाटणी ॥ ३ ॥ रामदासाचेंअंतर ॥ देवापाशींनिरंतर ॥ ४ ॥

## अभंग ४५९

देवआह्मांशीजोडला ॥ संतसंगेंसांपडला ॥ १ ॥ कडींकपाटींशिखरीं ॥ धुंडि तातिनानापरी ॥ २ ॥ नानाशास्त्रेंधांडोळिती ॥ जयाकारणेंकष्टती ॥ ३ ॥ राम दासह्मणेभावें ॥ वेगींसंतांशरणजावें ॥ ४ ॥

## अभंग ४६०

ब्रह्मादिकांसीदुर्लभ ॥ देवभक्तांशीसुलभ ॥ १ ॥ थोरपणेंआढळेना ॥ जाण पणासीकळेना ॥ २ ॥ नाहींयोगाचेआटणीं ॥ नाहींतपींतीर्थाटणीं ॥ ३ ॥ दास म्हणेसाधूविण ॥ नानासाधनांचेशीण ॥ ४ ॥

## अभंग ४६१

भेटीदेईनाजनांसी ॥ पाठीलागेसज्जनासी ॥ १ ॥ ऐसेंप्रीतीचेंलक्षण ॥ भे टीवीणनाहींक्षण २ नयेसाधनींसायासीं ॥ तोहाआत्माअविनाशी ॥ ३ ॥ रा मीरामदासह्मणे ॥ संतसंगाचेनिगुणें ॥

## अभंग ४६२

देहचिरकाळराहो ॥ अथवाशीघ्रकाळजावो ॥ १ ॥ आम्हांवस्तीकेलीरामीं नाहींआस्थादेहधामीं ॥ २ ॥ देहाहोवोउत्तमभोग ॥ अथवापडोदुःखभोग ॥ ३ ॥ रामीरामदासह्मणे ॥ देहदुःखावेगळेंजाण ॥ ४ ॥

## अभंग ४६३ मोक्षश्री.

आह्मींमोक्षलक्ष्मीवंत ॥ भवदरिद्रकोठेंतेथ ॥ १ ॥ श्रीपतीचेपरीजन ॥ आम्हीं स्वानंदसंपन्न ॥ २ ॥ समाधानतेंसभाग्य ॥ अलभ्य नभाग्य ॥ ३ ॥ रामीरा

मदासींदेव॥सख्यासहितस्वानूभव॥४॥

## अभंग ४६४

मोक्षश्रीतेअह्मांपाशीं॥द्रव्यसिद्धीनिच्यादासी॥१॥आह्मीपरमार्थसंपन्न॥अर्थकायपरिच्छिन्न॥२॥रामींरामदासींभाग्य॥चढतेंवाढतेंवैराग्य॥३॥ ७ ॥

## अभंग ४६५

परमार्थाचेदरिद्रीस्रून॥त्यांचेंनकरावेंविपरीत॥१॥परीसमर्थलक्षण॥सर्वकाळसमाधान॥२॥समर्थाचीविद्यालागी॥माधोकरीमागेजगीं॥३॥तेसेंरामीरामदासीं॥ब्रह्मविद्येच्यासायासीं॥४॥

## अभंग ४६६

दूरसांडोनियांमागें॥द्वितीगेलीलागवेगें॥१॥मायासांडूनियांचला॥झालास्वरूपींनिश्चळा॥२॥कांहींभासचिनादळे॥वृत्तिनिर्गुणींनिवळे॥३॥चराचरतेंसांडिलें॥बहुविधाओलांडिलें॥४॥अवघेंएकचिनिर्गुण॥पाहीवृत्तीचेआपण॥५
रामदाससांगेखूण॥वृत्तितुर्येचेंलक्षण॥६॥

## अभंग ४६७

दृढहोतांअनुसंधान॥मनजाहालेंउन्मन॥१॥पाहोंजातांमायानासे॥द्वैतगेलेंअनायासें॥२॥होतांबोधाचाप्रबोध॥झालानिःशब्दाचाशब्द॥३॥ज्ञानविज्ञानजाहलें॥वृत्तीनिवृत्तीपाहिलें॥४॥ध्यानधारणेचीबुद्धी॥झालीसहजसमाधी॥५॥रामीरामदास्यवाच्य॥पुढेंझालेंअनिर्वाच्य॥६॥

## अभंग ४६८

मनाहूनीविलक्षण॥तेंचिसमाधीलक्षण॥१॥नलगेपुरूनियांध्यावें॥नलगेजितेंचिमारावें॥२॥नलगेवायूआरोपावा॥नलगेब्रह्मांडासीन्यावा॥३॥डोळेझांकुनीबेसला॥परीतोमनेंआटोपिला॥४॥नानासाधनींसायास॥मनेंकेलेंकासावीस५रामदासह्मणेवर्म॥हेंचिमनाचेंस्रुगम॥६॥

## अभंग ४६९

गेलास्वरूपाच्याठाया॥इकडेब्रह्मतिकडेमाया॥१॥दोंहीमध्येंसांपडला॥मीचब्रह्मऐसेंबोलिला॥२॥ब्रह्मनिर्मळनिश्चळ॥मायाचंचळचपळ॥३॥तिकडेवस्तुनिराकार॥इकडेमायेचाविस्तार॥४॥पुढेंब्रम्हमागेंमाया॥मध्येंसंदेहाचीकाया॥५॥रामीरामदासह्मणे॥इतुकेंमनाचेंकरणें॥६॥ ॥७॥ ॥ ७ ॥

अभंग ४७० वैराग्यपर.

रावणासारिखीकोणाचीसंपत्ती॥तोहीगेलाअंतींएकलाची॥१॥ एक-
लाचिगेलावाळीतोवान्नर॥कपीथोरथोरतेहीगेले॥२॥गेलेचक्रवर्तीथो
रांवैभवाचे॥फारआयुष्याचेऋषेश्वर॥३॥ऋषेश्वरगेलेमार्कंडासारिखे॥
बहुतांचेलेखेकोणकरी॥४॥कोणकरीसर्वशाश्वतआपुलें॥सर्वराज्यगे
लेंकौरवांचें॥५॥कौरवनिमालेपांडवगळाले॥यादवहीगेलेएकसरां॥६
एकसरांगेलेराजेथोरथोर॥आणीकश्रीधरभाग्यवंत॥७॥भाग्यवंत-
गेलेएकामागेंएक॥हरिश्चंद्रादिकपुण्यशीळ॥८॥पुण्यशीळगेलेकीर्ती
ठेऊनियां॥पापीगेलेवायांअधोगती॥९॥ अधोगतीगेलेरामानभजतां
संसारींम्हणतांमाझेंमाझें॥१०॥माझेंमाझेंह्मणतांसाचाचियेपरी॥सेरवीं
दुराचारीएकलाची॥११॥एकलाचिजातांएकलाचीयेतां॥मध्येंचीदुश्चिता
मायाजाळीं॥१२॥मायाजाळींपापीजनगुंडाळले॥पुण्यशीळगेलेनिघो-
नियां॥१३॥निघोनियांगेलेसायुज्यपदासी॥रामींरामदासीचिरंजीव १४

अभंग ४७१

कोणाचेंहेंघरकोणाचासंसार॥सांडूनिशरीरजाणेंलागे॥१॥जाणेंलागे
अंतींएकलेंएकर॥व्यर्थखटपटजन्मवरी॥२॥जन्मवरीदेहसंसारींगोंवि
लें॥नाहींकाहींकेलेंआत्महित॥३॥आत्महितगेलेंसंसाराचेओढी॥ अं
तींकोणसोडीरामावीण॥४॥रामावीणकोणीसोडवीनाअंतीं॥वायांचि
रडतीजीवलगें॥५॥ जीवलगेंरामदूरीदुरावला॥विचारआपुलाजाणवेना
॥६॥जाणवेनापूर्णस्फूर्तावांचोनी॥पापियाचेमनींरामकैंचा॥७॥रामकैं-
चाजयालौकिकाचीचाड॥पुरवितांकोडसंसारींचें॥८॥संसारींचेंकोडतें-
चिवाटेगोड॥जयानाहींचाडअनुताप॥९॥ अनुतापीझालेसंसारींस्फरले॥
राजेराज्यगेलेसांडूनियां॥१०॥सांडूनियांगेलेवैभवसंपत्ती॥पुढेंयानायाती
चेनीभेणें॥११॥भेणेंनेशरणगेलेत्यादेवासी॥नेलेवैकुंठासीभक्तराज॥१२
भक्तराजभावेंभेटतीदेवासी॥रामेंरामदासींधन्यकेले॥१३॥

अभंग ४७२

मातापिताजनस्वजनकांचन॥स्त्रियापुत्रींमनगोंऊंनको॥१॥गोंऊंनकोमन
राघवावांचुनी॥लोकलाजजनींलागलीसे॥२॥लागलीसेपरीतुवांनधरा-

वी ॥ स्वहिता करावी रामभक्ती ॥ ३ ॥ रामभक्तीवीणहोशीलहिंपुटी ॥ एकलें शेवटीं ज्ञाणें लागे ॥ ४ ॥ जाणें लागे अंतीं बाळा सुलक्षणा ॥ ध्यायीं राम राणा दास ह्मणे ॥ ५ ॥

## अभंग ४७३.

आपुलीं पारखीं सर्व पारखिलीं ॥ नाहीं कामा आलीं रामावीण ॥ १ ॥ रामावीण जाणे सर्वही पैशून्य ॥ मावेचें करणें नाथिलेंची ॥ २ ॥ नाथियेलें आहे लोकांचें करणें ॥ तृणाचें तापणें जयापरी ॥ ३ ॥ तयापरीऐसा निश्चयो जाणावा ॥ सतीचा बोळावा आहे लोकां ॥ ४ ॥ लोक बहु रंग जाणूनी हो रंग ॥ रामदासीं संग सोडविला ॥ ५ ॥

## अभंग ४७४

दैन्यवाणा झाला प्राणी ॥ चंद्री लागली नयनीं ॥ १ ॥ ह्मणती उचलाउचला ॥ आतां भूमी भार झाला ॥ २ ॥ घोर लागला अमूप ॥ प्राणी झाला प्रेतरूप ॥ ३ ॥ दांतखिळी बैसली वाणी ॥ नाठा भरला करचरणीं ४ ॥ डोळे विक्राळ दीसती ॥ झांका झांका मुलें भीति ॥ ५ ॥ रामी रामदास ह्मणे ॥ अवघीं सुखाचीं पिसुणें ॥ ६ ॥

## अभंग ४७५.

जन्मवरी शीण केला ॥ अंतीं कामा नाहीं आला ॥ १ ॥ काया स्मशानीं घातली ॥ कन्यापुत्रें मुरडलीं ॥ २ ॥ शेतवाडा तो राहिला ॥ प्राणी जातसे एकला ॥ ३ ॥ धन धान्य तें राहिलें ॥ प्राणी चर्फडीत गेले ॥ ४ ॥ इष्टमित्र आणि सांगाती ॥ आपुलाल्या घरा जाती ॥ ५ ॥ दास ह्मणे प्राणी मेले ॥ कांहीं सार्थक नाहीं केलें ॥ ६ ॥

## अभंग ४७६.

आहे लक्ष्मीरे चंचळ ॥ इसी जातां नाहीं वेळ ॥ १ ॥ सत्य मानावें उत्तर ॥ देव नित्य निरंतर ॥ २ ॥ नाना वैभवें समस्त ॥ येती जाती अकस्मात ॥ ३ ॥ ह्मणे रामी रामदास ॥ नाहीं देहाचा विश्वास ॥ ४ ॥

## अभंग ४७७

पुरें पट्टणें वसती ॥ एके काळीं विध्वंसती ॥ १ ॥ तैसें वैभव सकळ ॥ येतां जातां नाहीं वेळ ॥ २ ॥ बहुत सृष्टीची रचना ॥ होते जाते क्षणक्ष-

णां ॥ ३ ॥ दास ह्मणे चक्रवर्त्ती ॥ आले गेले नेणों किती ॥ ४ ॥ ॥श्रीराम्

अभंग ४७८

रामनामाचा महिमा.

प्रातःकाळ झाला श्रीराम आठवा ॥ हृदयीं धरावा क्षण एक ॥ १ ॥ क्षण एक राम हृदयीं धरिजे ॥ संसार तरीजे हेळा मात्रें ॥ २ ॥ हेळामात्रें राम नाम सर्व गाती ॥ भाग्यवंत ध्याती सर्व काळ ॥ ३ ॥ सर्वकाळ राम मानसीं धरावा ॥ वाचे उच्चारावा नाम घोष ॥ ४ ॥ नाम घोष वाचे श्रवण मनन ॥ चरणीं गमन देवालया ॥ ५ ॥ देवालया जातां सार्थक हें झालें ॥ कारणीं लागलें कलेवर ॥ ६ ॥ कलेवर त्याचा जोडूनी हस्तक ॥ ठेवावें मस्तक रामपायीं ॥ ७ ॥ रामपायीं शिळा झाली दिव्य बाळा ॥ तैसाची सोंहळा मानवांसी ॥ ८ ॥ मानवांसी अंतीं रामनाम गती ॥ स्मरे उमापती महादेव ॥ ९ ॥ महादेव जप सांगे पार्वतीसी ॥ तोचि तो विश्वासी रामदास १०

अभंग ४७९

आरंभीं वंदिन अयोध्येचा राजा ॥ भक्तांचिया काजा पावतसे ॥ १ ॥ पावतसे महा संकटीं निर्वाणीं ॥ रामनामवाणी उच्चारितां ॥ २ ॥ उच्चारितां राम होय पापक्षय ॥ पुण्याचा उपाय पुण्यभूमी ॥ ३ ॥ पुण्यभूमी पुण्यवंतासी आठवे ॥ पापियां नाठवे कांहीं केल्या ॥ ४ ॥ कांहीं केल्या तुझें मन पालटेना ॥ दास ह्मणे जाणा साधीं वेगीं ॥ ५ ॥ ॥श्रीराम् ॥

अभंग ४८०

लोखंडाचें सोनें परिसाचेनी संगें ॥ साधूचेनि योगें बद्ध सिद्ध ॥ १ ॥ बद्धसिद्ध होती देखत देखतां ॥ होय सार्थकता तात्काळची ॥ २ ॥ तात्काळचि झाला वाल्हा तो वाल्मीक ॥ दास पुण्यश्लोक रामनामें ॥ ३ ॥

अभंग ४८१

मुक्तपणें रामनामाचा अव्हेरू ॥ करितो गव्हारू मुक्त नव्हे ॥ १ ॥ मुक्त नव्हे काय स्वयें शूलपाणी ॥ रामनाम वाणी उच्चारितो ॥ २ ॥ उच्चारितो शिव तेथें केंचे जीव ॥ बापुडे मानव देहधारी ॥ ३ ॥ देहधारी नर धन्य तो साचार ॥ वाचे निरंतर रामनाम ॥ ४ ॥ रामनाम वाचे रूप अभ्यंतरीं ॥ धन्य तो संसारीं दास ह्मणे ॥ ५ ॥ ॥श्रीमदयोध्यावासी रामचंद्र॰

### अभंग ४८१.

श्रीराम जयराम नाम दो अक्षरीं ॥ सहस्र नामावरी ब्रीद गाजे ॥ १ ॥
उफराटें अक्षर वाल्मीक वैखरी ॥ वंदीजे सुरवरीं ब्रह्मादिकीं ॥ २ ॥
शुक पदविता वेश्येचे मंदिरीं ॥ वैकुंठ माझारी ख्याती झाली ॥ ३ ॥
रामदास ह्मणे रामनाम घोष ॥ त्रैलोक्याचा दोष निर्दाळीला ॥ ४ ॥

### अभंग ४८२

रानीं वनीं मनीं राम असां ध्यावा ॥ करितो कुडावा सेवकाचा ॥ १ ॥
सेवकाचा भार घेतला साचार ॥ म्हणूनि अंतर पडों नेदी ॥ २ ॥ प-
डों नेदी शब्द माझा भूमीवरी ॥ दृढ चित्तीं धरी देवराण ॥ ३ ॥ देवरा-
णा सर्व काळ सोडविता ॥ लागलीसे चिंता माझी त्यासी ॥ ४ ॥ माझि-
चिंता करी राव अयोध्येचा ॥ कृपाळु दीनाचा दास ह्मणे ॥ ५ ॥ श्रीशं

### अभंग ४८३

साराचेंही सार सांगतों तुह्मांसी ॥ ह्मणा अहर्निशीं राम राम ॥ १ ॥ स-
गुण मूर्तीचें करावें अर्चन ॥ फळ केल्यासी अन्न यथाशक्ती ॥ २ ॥ स-
ज्जनाची सेवा कीर्तनाची प्रीती ॥ होईल विश्रांती दास ह्मणे ॥ ३ ॥

### अभंग ४८४.

सोपें हें सुगम नाम राघोबाचें ॥ सर्वकाळ वाचे येऊं द्यावें ॥ १ ॥ येउं
द्यावें वाचे नाम निरंतर ॥ तेणें हा संसार तरशील ॥ २ ॥ तरशील रा-
मीं रामदास ह्मणे ॥ सावधान होणें राम नामीं ॥ ३ ॥ ॥ श्रीरामजय०

### अभंग ४८५

राघवाचें नाम राखशील जरी ॥ तुज राखे तरी देवराणा ॥ १ ॥ देवरा-
णा माझें जीवींचें जीवन ॥ आवडीनें खूण सांगतसे ॥ २ ॥ सांगतसे
खूण माझे अंतरींचीं ॥ सर्वही सुखाची सुखमूर्ती ॥ ३ ॥ सुखमूर्ती
राम सोडूं नको कदा ॥ तो तुज आपदा लागों नेदी ॥ ४ ॥ लागों नेदी
कष्ट आपुल्या दासासी ॥ रामीं रामदासीं साह्यकारी ॥ ५ ॥ श्रीशं ॥

### अभंग ४८६

( समर्थ निर्याण ) ॥ आज्ञे प्रमाणें परमार्थ ॥ केला जाण
म्यां यथार्थ ॥ १ ॥ आतां देहाचा कंटाळा ॥ आला असेंजी दयाळा ॥ २ ॥

आतां एकचि मागणें ॥ कृपा करूनियां देणें ॥३॥ ज्याची दर्शनाची आ-
शा ॥ त्याची पुरवावी इच्छा ॥४॥ ऐक सखया वचन ॥ त्यासी देईन द-
र्शन ॥५॥ तेरा अक्षरी मंत्राचा ॥ जप करील जो साचा ॥६॥ गणना हो
तां तेरा कोटी ॥ त्यासी भेटेन जगजेठी ॥७॥ भय न धरावें मनीं ॥ बहू
बोलिलों ह्मणूनी ॥८॥ नलगे आसनीं बैसावें ॥ नलगे अन्नही त्या-
गावें ॥९॥ येतां जातां धंदा करितां ॥ जपसंख्या मात्र होतां ॥१०॥ तेरा
कोटी गणना तेची ॥ पापें निरसती जन्मांतरींचीं ॥११॥ त्यासी देई-
न दर्शन ॥ तात्काळची मुक्त होणें ॥१२॥ ऐसा वर होतां जाण ॥ दास
झाला सुखसंपन्न ॥१३॥

## अभंग ४८७

सकळ साधनांचें फळ ॥ रामनामचि केवळ ॥१॥ जप तप अनुष्ठान ॥
अंतीं नामचि प्रमाण ॥२॥ नानामंत्र यंत्रावळी ॥ सोडवीना अंतका-
ळीं ॥३॥ महा पातकी पतीत ॥ नामें तरले अनंत ॥४॥ नाम साराचें
ही सार ॥ नाम सकळांसी आधार ॥५॥ दास ह्मणे सांगूं किती ॥ नामें
वीण नाहीं गती ॥६॥

## अभंग ४८८

रामनामावीण कांहीं ॥ अंतीं सोडवीतें नाहीं ॥१॥ थोर थोर योगेश्व-
र ॥ अथवा प्रपंची इतर ॥२॥ थोरपण धरितां ताठा ॥ तरी तो नागव-
ला करंटा ॥३॥ बहू पूजिलीं दैवतें ॥ योग याग नाना मतें ॥४॥ धोती
पोती आणि भुजंगी ॥ लोली मार्ग करिती योगी ॥५॥ विनवी रामी रा-
मदास ॥ नानासाधनीं सायास ॥६॥

## अभंग ४८९

राम उपासक तोचि एक धन्य ॥ जो कोणी अनन्य रामनामीं ॥१॥ रामना-
मीं भाव जयाचा केवळ ॥ येर खळ खळ आवडेना ॥२॥ नावडती मं
त्र विविध विचित्र ॥ जया यंत्र तंत्र रामनाम ॥३॥ रामनाम जप रामना
म तप ॥ शब्द सुखरूप रामनाम ॥४॥ रामनाम सिद्धि रामनाम बुद्धि
सर्वशास्त्रविधी रामनाम ॥५॥ रामनाम योग रामनाम याग ॥ सर्व-
स्वाचा त्याग रामनाम ॥६॥ रामनाम धर्म रामनाम अर्थ ॥ चारी पु-

रुषार्थ रामनाम ॥७॥ रामनाम गती रामनाम मती ॥ आदिमध्यअंतीं राम नाम ॥८॥ रामनाम येणें कृतकृत्य होणें ॥ रामदास ह्मणे स्वानुभवें ९

## अभंग ४९०.

येणें काय आलें याचीया हातासी ॥ नवल कृपा कैसी राघवाची ॥१ सख्य तरी आह्मीं थोर केलें रामीं ॥ जिव्हा मात्र नामीं हालवितों ॥२॥ ओरडूनि घोक करीतसे उलूक ॥ त्याचा सर्व लोक करिती खेद ॥ ३॥ रामीं रामदासीं हें पुरवे आह्मांसीं ॥ फुकाची रामेंशीं सख्य झालें ॥४॥

## अभंग ४९१.

अनाथाचा नाथ दीनाचा कैवारी ॥ सिंहासनावरी शोभतसे ॥१॥ शोभतसे राम प्रतापें आगळा ॥ दिसे सौम्य लीला सत्वगुणी ॥२॥ सत्वगुणीं होणें सात्विकां कारणें ॥ क्रोधें संहारणें दुर्जनांसी ॥३॥ दुर्जनां संहारू सज्जनां आधारू ॥ भाविकांसी पारू पाववितो ॥४॥ पाववीतो पार या भवसिंधूच्या ॥ राघव दीनाचा दीनानाथ ॥ ५॥ दीनानाथ राम पतित पावन ॥ योगियांजीवन अवलीला ॥६॥ लीला वेषधारी भक्तांचें माहेर ॥ धन्य गौरीहर चिंतीतसे ॥७॥ चिंतीतसे रामनाम पूर्ण काम ॥ पावला विश्राम राम नामें ॥८॥ रामनामें हर अमर जाहला ॥ हें तो समस्तांला श्रुत आहे ॥९॥ श्रुत आहे राम योग्यांचें मंडन ॥ संसार खंडन महादोष ॥१०॥ महा भय कैचें रामासी भजतां ॥ हें जाण अन्यथा वाक्य नव्हे ॥११॥ नव्हे सोडवण रामनामेंवीण ॥ रामदास खूण सांगतसे ॥१२॥

## अभंग ४९२. (हरिकथा.)

राघोबाची कथा पतित पावन ॥ गाती भक्तजन आवडीनें ॥१॥ राघोबाच्या गुणां न दिसे तुळणा ॥ कैलासींचा राणा लांचावला ॥२॥ देवांचें मंडण भक्तांचें भूषण ॥ भक्तांचें रक्षण राम एक ॥३॥ रामदास ह्मणे धन्य त्यांचें जिणें ॥ कथा निरूपणें जन्म गेला ॥४॥

## अभंग ४९३

कथा निरूपणें समाधी लागली ॥ वासना त्यागिली अंतरींची ॥१॥ नाहीं आपपर कीर्तनीं तत्पर ॥ मनीं सारासार विचारणा ॥२॥ अर्थारू-

द मन श्रवण मनन ॥ होय समाधान निजध्यासें ॥ ३ ॥ रामीं रामदासीं कथेची आवडी ॥ लागलीसे गोडी नित्य नवी ॥ ४ ॥

अभंग ४९४.

रामनामकथा श्रवणीं पडतां ॥ होय सार्थकता श्रवणाची ॥ १ ॥ मुखीं नाम घेतां रूप आठवेल ॥ प्रेम दुणावेल पाहावया ॥ २ ॥ राम माझे मनीं शोभे सिंहासनीं ॥ एक एकीं ध्यानीं आठवला ॥ ३ ॥ रामदास ह्मणे विश्रांती मागेन ॥ जीवींचें सांगेन गुज कांहीं ॥ ४ ॥ ॥ श्रीरामचंद्र

अभंग ४९५.

नाहं वसामि वैकुंठे० ॥ ॥ नाहीं वैकुंठींचे ठायीं ॥ नाहीं योगियां ह्रदयीं ॥ १ ॥ माझे भक्त गाती जेथें ॥ नारदा मी वसें तेथें ॥ २ ॥ भानु तेजा मी नातुडे ॥ तो मी कीर्तनीं सांपडें ॥ ३ ॥ रामदास ह्मणे साचें ॥ वाक्य आहे भगवंताचें ॥ ४ ॥

अभंग ४९६

कथा भगवंताची सार ॥ सकळ तीर्थांचें माहेर ॥ १ ॥ गंगा यमुना सरस्वती ॥ कृष्णा वेण्या भागीरथी ॥ २ ॥ श्वेतबंध वाराणशी ॥ पुण्य लाभे हरिकथेसी ॥ ३ ॥ दास ह्मणे संत संग ॥ सदा कथेचा प्रसंग ॥ ४

अभंग ४९७

टाळ वाजे मंद मंद ॥ मुखीं हरिनामाचा छंद ॥ १ ॥ फडके टाळी एकवेळा ॥ घोष नामाचा आगळा ॥ २ ॥ रंगीं हरिदास मातले ॥ नामघोषें आनंदले ॥ ३ ॥ उभे हरिदास रंगणीं ॥ रामदास लोटांगणीं ॥ ४ ॥

अभंग ४९८

ध्यान विषयाचें तुटावें ॥ ह्मणूनी हरिकथेसी जावें ॥ १ ॥ ऐसी हे चीगाथा गोंवी ॥ तरी तें धांवणें नागवी ॥ २ ॥ विषयासी कंटाळलों ॥ म्हणुनी हरिकथेसी आलों ॥ ३ ॥ विषय ध्यान सोडावया ॥ आलों कीर्तनाच्या ठायां ॥ ४ ॥ काम क्रोध मज पाशीं ॥ म्हणुनी आलों हरिकथेसी ॥ ५ रामी राम दास ह्मणे ॥ वाद सांडूनियां देणें ॥ ६ ॥

अभंग ४९९.

राग मूर्छना कळेना ॥ ताल ध्रुवपद कळेना ॥ १ ॥ या वेगळें सर्व वाव ॥ श्री-

तीं सावधान व्हावें ॥ २ ॥ अर्थ प्रबंध विचार ॥ तोहि कळेना साचार ॥ ३ ॥ भक्ति ज्ञानाचा विश्वास ॥ नाहीं ह्मणे रामदास ॥ ४ ॥ ॥ श्रीरामचंद्र ॥

अभंग ५०० ( करुणापर )

पतित पावना जानकी जीवना ॥ वेगीं माझ्या मना पालटावें ॥ ध्रु ॥ भक्तीची आवडी नाहीं निरंतर ॥ कोरडें अंतर भावेंवीण ॥ १ ॥ माझें मी तूंपण गेलें नाहीं देवा ॥ काय करूं ठेवा संचीताचा ॥ २ ॥ रामदास ह्मणे पतितांचें उणें ॥ पतित पावनें सांभाळावें ॥ ३ ॥

अभंग ५०१

पतित पावना जानकी जीवना ॥ वेगीं माझ्या मना पालटावें ॥ ध्रु ॥ मुखें बोले ज्ञान पोटीं अभिमान ॥ पाहे परन्यून सर्व काळ ॥ १ ॥ दृढ देह बुद्धी तेणें नव्हे शुद्धी ॥ जाहलों मी क्रोधी अनावर ॥ २ ॥ रामदास ह्मणे ऐसा मी अज्ञान ॥ सर्व ब्रह्मज्ञान बोलतसे ॥ ३ ॥ श्रीराम ॥ ७ ॥ ७

अभंग ५०२

पतित पावना जानकी जीवना ॥ वेगीं माझ्या मना पालटावें ॥ ध्रु ॥ वैराग्याचा लेश नाहीं माझे अंगीं ॥ बोलतसें जगीं शब्द ज्ञान ॥ १ ॥ देह हें कारणीं लावावें नावडे ॥ आळस आवडे सर्व काळ ॥ २ ॥ रामदास ह्मणे लाज तूझी तुज ॥ कोण पुसे मज अज्ञानासी ॥ ३ ॥ श्रीराम

अभंग ५०३

पतित पावना जानकी जीवना ॥ वेगीं माझ्या मना पालटावें ॥ ध्रु ॥ मिथ्या शब्दज्ञानें तुज अंतरलों ॥ संदेहीं पडलों मीपणाच्या ॥ १ ॥ सदा खळ खळ निर्गुणाची घडे ॥ सगुण नातुडे ज्ञान गर्वें ॥ २ ॥ रामदास ह्मणे ऐसा मी पतित ॥ मीपणें अनंत आतुडेना ॥ ३ ॥ ॥ श्रीराम ॥

अभंग ५०४

पतित पावना जानकी जीवना ॥ वेगीं माझ्या मना पालटावें ॥ ध्रु ॥ मन हें चंचळ न राहे निश्चळ ॥ निरूपणीं पळ स्थिरावेना ॥ १ ॥ सांडुनियां ध्यान विषयचिंतन ॥ करीतसे मन आवरेना ॥ २ ॥ रामदास ह्मणे कथा निरूपणें ॥ मनाचीं लक्षणें जैशीं तैशीं ॥ ३ ॥ श्रीरामचंद्र ॥

अभं

पतीतपावना जानकी जीवना ॥ वेगीं माझ्या मना पालटावें ॥ ध्रु० ॥ संसा रचे संगें दुःखी फार झालों ॥ ह्मणूनियां आलों शरण तुज ॥ १ ॥ याला- गीं राघवा भक्तां उद्धरावें ॥ आपुलें राखावें नाम देवा ॥ २ ॥ रामदास ह्मणे लाज तुझी तुज ॥ कोण पुसे मज अनाथासी ॥ ३ ॥ ॥ श्रीराम

अभंग ५०६

देवा मज आतां वाटे तुझी चिंता ॥ पवाडे वर्णितां हांसतील ॥ १ ॥ नस- ता लौकीक नामा ऐशी क्रिया ॥ मग हांसावया काय उणें ॥ २ ॥ मेहूणा मंगळ हांसतील तुज ॥ ह्मणूनियां मज लाज वाटे ॥ ३ ॥ रामदास ह्म- णे नाम जड झालें ॥ ऐसें काय केलें देव राया ॥ ४ ॥ ॥ श्रीरामचंद्रम्

अभंग ५०७

गणिकेनें देवा काय भजन केलें ॥ संकेतें घेतलें नाम तूझें ॥ १ ॥ एका नामा साठीं विमान उतरावें ॥ आह्मां न पावावें अनाथासी ॥ २ ॥ का- य त्या नामाची विरी गेली आतां ॥ सांग बा रघूनाथा राम राया ॥ ३ तेव्हां होतें तुह्मां दीननाथपण ॥ आतां उद्यापन काय केलें ॥ ४ ॥ रामदास ह्मणे न बोलें पुढती ॥ येई बा रघुपती वेगीं आतां ॥ ५ ॥

अभंग ५०८

मी खरा पतित तूं खरा पावन ॥ आतां अनुमान करूं नको ॥ १ ॥ आ- तां कांहीं मज माझी चिंता नसे ॥ तुझें नाम कैसें वांचवील ॥ २ ॥ स- मर्थे घेतला नामासाठीं भार ॥ मज उपकार कासयाचा ॥ ३ ॥ रामदा- स ह्मणे तुझें तूज उणें ॥ सोयरे पीसूण हांसतील ॥ ४ ॥ ॥ ७ ॥ श्री.

अभंग ५०९

माझें सर्व जावो तुझें नाम राहो ॥ हाचि माझा भावो अंतरींचा ॥ १ पतित जाईल नाम हें जाईल ॥ मग कोण राहील तुजपाशीं ॥ २ ॥ ह्म- णूनियां देवा भक्तां उद्धरावें ॥ आपुलें राखावें नाम देवा ॥ ३ ॥ रामदा- स ह्मणे देवा तुझी आण ॥ बीदासाठीं प्राण देणें लागे ॥ ४ ॥ श्री:

अभंग ५१०

राम माझी माय कधीं भेटईल ॥ वोरस देईल आलिंगनें ॥ १ ॥ संसा- राचें दुःख दाटलें मानसीं ॥ तें मी तुजपाशीं सांगईन ॥ २ ॥ उतावेळ

चित्त उभारूनी बाहे ॥ रामदास पाहे वाट तूझी ॥ ३ ॥ ॥श्रीशांवंदे ॥ ७ ॥

## अभंग ५११.

कांवो राम माये दुरी धरियेलें॥कठीण केसें झालें चित्त तुझें ॥ १ ॥ देऊनिआ लिंगन प्रीति पडीभरें ॥ मुख पीतांबरें पुसशील ॥ २ ॥ घेऊनि कडीये धरुनी हनुवटी ॥ कई गुज गोष्टी सांगशील ॥ ३ ॥ रामदास ह्मणे केल्हां संबोखिशी ॥ प्रेमें पान्हा देशी जननीये ॥ ४ ॥

## अभंग ५१२.

तुकाई यमाई नमूं चंडाबाई ॥ जाखाई जोखाई सटवाई ने ॥ १ ॥ सटवाई जगदंबा आदिशक्ती अंबा ॥ तुह्मी त्या स्वयंभा दाखवावें ॥ २ ॥ दाखवावें तुह्मीं सर्वां पैलीकडे ॥ देखतांची घडे मोक्षपद ॥ ३ ॥ मोक्षपद घडे मोक्षासी पाहातां ॥ तद्रूपचि होतां दास ह्मणे ॥ ४ ॥ श्रीराम ॥

## अभंग ५१३.

सूर्यनारायणा देवा नमस्कार ॥ तुवां निराकार दाखवावें ॥ १ ॥ दाखवूनि द्यावें मज निववावें ॥ चंद्रा तुज भावें प्रार्थीतसें ॥ २ ॥ प्रार्थीतसें मही आणि अंतरीक्षा ॥ तुह्मी त्या अलक्षा लक्षवावें ॥ ३ ॥ लक्षवावें मज आपो नारायणें ॥ ब्रह्मप्राप्ती जेणें तें करावें ॥ ४ ॥ करावें सनाथ अग्निप्रभंजनें ॥ नक्षत्रीं वरुणें दास ह्मणे ॥ ५ ॥

## अभंग ५१४.

नमो रामकृष्णा नमो नारायणा ॥ तुह्मीं त्या निर्गुणा दाखवावें ॥ १ ॥ दाखवावें नीज स्वरूप आपुलें ॥ दिसेनासें झालें काय करूं ॥ २ ॥ काय करूं आतां देवा नरहरी ॥ पंढरि माझारीं पांडुरंगा ॥ ३ ॥ पांडुरंगा देवा अगा महादेवा ॥ मज द्यावा ठावा परब्रह्मीं ॥ ४ ॥ ब्रह्मीं ब्रह्मरूपतें मज करावें ॥ रामदास भावें प्रार्थीतसे ॥ ५ ॥

## अभंग ५१५

तुह्मी सर्व देव मिळूनी पावावें ॥ वेगीं मज न्यावें परब्रह्मीं ॥ १ ॥ परब्रह्मीं न्यावें संत महानुभवीं ॥ मज या वैभवीं चाड नाहीं ॥ २ ॥ चाड नाही एका निर्गुणावांचूनी ॥ माझे ध्यानीं मनीं निरंजन ॥ ३ ॥ निरंजन माझा मजभेट वावा ॥ तेणें होय जीवा समाधान ॥ ४ ॥ समाधानमाझें

करा गा सर्व हो॥ तुह्मांसि देव हो विसरेना॥५॥ विसरेना देहो चाल-
तों तों वरी॥ बाह्य अभ्यंतरीं दास ह्मणे॥६॥ ॥श्रीशांबंदे॥ ७॥॥

## अभंग ५१६

तूं काय झालासी अगा निरंजना॥ आह्मां भक्तजनां सांभाळावें॥१॥सां
भाळावें सदा सबाह्य अंतरीं॥ आह्मां क्षणभरी सोडूं नका॥२॥ सोडूं
नको वांयां गुप्त कां झालासी॥ देवा देखीलासी संत संगें॥३॥ संत संगें
गुप्त होऊनि पाहीलें॥ संगत्यागें झालें दरशन॥४॥ दरशन झालें तेंचि
ते जाणती॥ नसूनि असती कल्पकोडी॥५॥ कल्प कोडी जोडी झाली नि-
र्गुणाची॥ दास ह्मणे कैंची देहबुद्धी॥६॥

## अभंग ५१७

देवेंवीण आतां मज कंठवेना॥ कृपाळू तो नानाठायीं वसे॥१॥ नाना
ठायीं देव असे जेथें तेथें॥ तयावीण रीतें स्थळ नाहीं॥२॥ स्थळ ना-
हीं रीतें ब्रह्म तें पुरतें॥ जेथें जावें तेथें मागें पुढें॥३॥ मागें पुढें ब्रह्म
सर्वत्र व्यापक॥ दासतो निःशंक मागें पुढें॥४॥

## अभंग ५१८

निष्ठुर झालासी कांरे देवराया॥ मनांतील माया टाकियेली॥१॥ टाकि-
येली माया झालासी कठीण॥ तेणें बहूशीण झाला मज॥२॥ झाला
मज शीण आत्यंतिक फार॥ दुःखाचे डोंगर कोसळले॥३॥ कोसळलें
दुःख त्वांहीं वोसंडीलें॥ आणूनि सांडीलें वनांतरीं॥४॥ वनांतरीं नाहीं
कोणाचा आधार॥ त्वांहीं निराधार केलें देवा॥५॥ केलें देवा मज वि-
देशीं परदेशी॥ तेथें म्यां कोणासी पाचारावें॥६॥ पाचारावें कोणा सां-
भाळील कोण॥ हिंडे वण वण वनांतरीं॥७॥ वनांतरीं हिंडे कोणी ना-
हीं सखा॥ झालाशी पारिखा तूंही देवा॥८॥ तूंही देवा नको सोडूं कृ-
ळवळा॥ भक्तांच्या स्नेहाळा माय बापा॥९॥ माय बापा दूरी धरूं नको आ-
ह्मां॥ तुवां शिवरामा उद्धरावें॥१०॥

## अभंग ५१९

देवा तूं समर्थ तुज येणें जाणें॥ नव्हे श्लाघ्यवाणें सर्वथा ही॥१॥ सर्वथा-
ही श्लाघ्य दुःख आणि शोक॥ उणे पुरे लोक बोलताती॥२॥ बोलताति

जैसें सर्वहि सांडावें॥ निश्चळचि व्हावें दास ह्मणे॥३॥ ॥श्रीशंवंदे॥

## अभंग ५२०

उदारांच्या राण्या भक्तांच्या मंडणा॥ माझ्या अवगुणा भालरावें॥१॥ आतां मज ऐसें करीबा राघवा॥ देई तुझी सेवा हेंचि सार॥२॥सर्व काळ ध्यान तुझेंचि करीन॥ ऐसें माझें मन करी देवा॥३॥ परस्त्रीकांचनींनिर्मळ वासना॥ तुझीया भजना सावधान॥४॥मज अभाविका भावार्थ लावावा॥ विकल्प त्यागावा अंतरींचा॥५॥ माझें उणें पुरें रामा सांभाळावें॥सनाथ करावें दास ह्मणे॥६॥

## अभंग ५२१

ब्रीद आपुलें राखावें॥ आह्मां भक्तां सांभाळावें॥१॥ बहू नाहीं वाडा चार॥ आतां एकचि निर्धार॥२॥ येथें नाहीं कांहीं व्यस्त॥ आतां बोलतों नेमस्त॥३॥ रामदास ह्मणे एक॥ आतां बोलतों नेमक॥४॥

## अभंग ५२२

जो का भगवंताचा दास॥ तेणें असावें उदास १ काय देतिल तेंची घ्यावें॥ कोणा कांहीं न मागावें॥२॥ आशा कोणाची न करावी॥ बुद्धिभगवंतीं लावावी॥३॥सदा श्रवण मननें॥ आणि इंद्रिय दमनें॥४॥ नाना परी बोधुनी जीवा॥ आपुला परमार्थ साधावा॥५॥ रामदासीं पूर्ण कामें॥ बुद्धि दिली हे श्रीरामें॥६॥

## अभंग ५२३

नको ओळखीचे जन॥ अंगीं जडे अभिमान॥१॥ आतां तेथें जावें मना॥जेथें कोणी ओळखीना॥२॥ लोक ह्मणती कोण काय॥ पुसतांही सांगूं नये॥३॥ रामदास ह्मणे पाहीं॥ तेथें कांहीं चिंता नाहीं॥४॥

## अभंग ५२४.

बोलवेना तें बोलावें॥ चालवेना तेथें जावें॥१॥ नवल स्वरूपाच्या योगें॥ जीवपणाचे वियोगें॥२॥ वाट नाहीं तेथें जावें॥ जाणवेना तें जाणावें॥३॥ नसूनियां भेटी घ्यावी॥ तुटी असोनी पाडावी॥४॥ रामदासीं दृढ बुद्धि॥ होतां सहज समाधी॥५॥

## अभंग ५२५

पांचा मध्यें जें पहिलें॥ पाहतां तैसेंची वहिलें॥१॥ तीन अक्षरीं उच्चार

त्यासी माझा नमस्कार ॥ २॥ सानाजणांचे शेवटीं ॥ आवां करितां होते भे-
टी॥३॥ रामीं राम दास ह्मणे ॥ नवां माजी पहिल्या गुणें ॥ ४॥ ॥श्रीराम्

## अभंग ५२६.

पहिला गूण दुसरा पक्ष॥ तेणें लक्षावा अलक्ष॥ १॥ देव जवळी चुकला भक्त भेदें भांबावला॥ २॥ पुढें सांपडतां धन॥ वांयां करावें साधन॥ ३॥ रामदास ह्मणे सार॥ तेथें पाहिजे विचार॥ ४॥

## अभंग ५२७ विवेक.

कापूर राहीना रक्षणा वांचूनी॥ जाय तत्क्षणीं निघोनीयां॥ १॥ निघोनियां जाय पारा एकसरा॥ तेसें ज्ञान नरांपासूनियां॥ २॥ पासुनीयां जाय ज्ञान हें तात्काळ॥ जंव नाहीं बळ विवेकाचें॥ ३॥ विवेकाचें बळ पाहिजे प्रबळ॥ तरीच निवळ वृत्ति होय॥ ४॥ वृत्ति होय स्थिर श्रवण मननें॥ राघोबाचे ध्यानें दास ह्मणे॥ ५॥

## अभंग ५२८.

ज्याचेनी जितोसी त्यासी चुकलासी॥ व्यर्थचि झालासी भूमीभार॥ १॥ भूमिभार जिणें तुझें गुरूवीण॥ वचन प्रमाण जाण बाप्पा॥ २॥ जाण बाप्पा गुरुवीण गती नाहीं॥ पडशि प्रवाहीं मायाजाळीं॥ ३॥ मायाजाळीं पायां गुंतलाशीं मूढा॥ जन्मवरी ओढा तडातोडी॥ ४॥ कांहीं तडातोडी कांहीं देव जोडी॥ आयुष्याची घडी ऐशी वेंचीं॥ ५॥ ऐशि वेंचीं बापा आपुली वयसा॥ दास ह्मणे ऐसा काळ घालीं॥ ६॥ ॥श्रीमद्रघुवी०

## अभंग ५२९

वृद्ध ते ह्मणती संसार करावा॥ जना हातीं घ्यावा ह्मणुनी बरें॥ १॥ ह्मणतानि बरें जन ते कोणाला॥ बुडविती त्याला ऐशा बोधीं॥ २॥ वैश्वदेव दान अतिथीतें घडे॥ टाकि एकीकडे केले दोष॥ ३॥ मूर्ख तो ह्मणावा काय जी वाल्मीक॥ टाकितां सकळिक मुक्त जाहला॥ ४॥ रामदास ह्मणे कथिलें जें वेदीं॥ तयामात्र वंदीं इतर थोर॥ ५॥

## अभंग ५३०

सर्वस्वें बुडत ऐशी तो मातोक्ती॥ न धरावी चित्तीं साधकानीं॥ १॥ भरत तो मूर्ख होता काय सांग॥ मातेचाही त्याग केला जेणें॥ २॥ पित्यातें सा-

गीलें दैत्येंद्र प्रल्हादें ॥ कां त्याशीं गोविंदें स्नेह केला ॥ ३॥ दैत्यें बिभीषणें याकियेला बंधु ॥ रामासि संबंधु जोडीयेला ॥४॥ रामदास ह्मणे शुक्र होता गुरू ॥ परंतु दातारू धन्य बळी ॥५॥

## अभंग ५३१

संसारी न होता काय तो जनक ॥ ह्मणती विवेक न करितां ॥ १॥ सत्य युग आणि आयुष्य भरवसा ॥ याज्ञवल्क्या ऐसा उपदेशिता ॥२॥ ऋषीश्वर नित्य येती जाती घरा ॥ तेणें वनांतरा कां जावें हो ॥३॥ ऐशी तु ह्मां काय असे अनुकूळता ॥ मूर्ख नाशाथितां कां करितां ॥४॥ रामदास ह्मणे कलियुगीं हेंची ॥ वाट साधनाची बरी सांगी ॥५॥ ॥श्रीरामचंद्र

## अभंग ५३२

मुनीश्वरा ऐसे नकरा नियम ॥ जनकाचे सम कां करारे ॥ १॥ ज्यागोत्रींचे तुह्मीं तयां ऋषीश्वरीं ॥ केलें तैसें करी आचरण ॥२॥ प्रथम साधक लक्षणें इतुकीं ॥ पुढें आतां भाकी सिद्ध चिन्ह ॥ ३॥ सांगूनि लक्षणं कथीन आचरणें ॥ पूर्णाशीजीं विघ्नें तींहीं सांगूं ॥४॥ रामदास ह्मणे साधन जें केलें पुढील चुकविले जन्मफेरे ॥५॥

## अभंग ५३३.

व्हावया तो योगी कैसा अधिकार ॥ तयाला साचार प्राप्ती होय ॥ १॥ पाहिजे अनुताप तापलों मी फार ॥ विश्रांतीसी थार नाहीं नाहीं ॥ २॥ नरदेहीं जन्मूनि विषयीक झालों ॥ स्वार्थासि चुकलों हेंची शोधा ॥३॥ ऐसा अनुताप नित्य तो वाहतां ॥ वैराग्य ये हाता त्या प्राण्यांच्या ॥४॥ रामदास ह्मणे त्रिविध वैराग्य ॥ भोगूनि आरोग्य केलें देहा ॥५॥ ॥

## अभंग ५३४॥ त्रिविधवैराग्य.

सात्विक राजस तामस त्रिविध ॥ वैराग्याचे भेद योगी वदती ॥ १॥ देवीं मत्त करी मन धरणी साचे ॥ टाकी ब्राह्मणाचे नेम धर्म ॥२॥ होऊनि गोसावी लाविती कौपीन ॥ दया क्षमा ज्ञान हीन राख ॥३॥ मठ ते बांधूनी व्यवहार करिती ॥ कल्पीं त्यां श्रीपती न भेटेल ॥४॥ रामदास म्हणे हे तामस योगी ॥ रौरवाचे भोगी केलें देवें ॥५॥

## अभंग ५३५.

करूनी कीर्तन योग्यता मिरवणें ॥ देशोदेशीं जाणें द्रव्या सार्गे ॥ १॥ द्रव्य

येतां पुढें प्रेमानें कीर्तन॥ स्त्रचवितो मान धन इच्छा॥२॥ राजा देऊं जा-
तां देऊळ बांधणें॥ येवढी या धनें काय होतें॥३॥ दात्यानीं त्रासावें स-
र्वानीं हांसावें॥त्या मानवा पावे देव कैसा॥४॥ रामदास ह्मणे देव तो स-
मीप॥ गांठीं ऐसें पाप जोडा परी॥५॥

## अभंग ५३६

देउळाचे मिसें द्रव्य तें जोडावें॥ गांठीचें मोडावें पुण्यधन॥१॥ येरवीं तें
काय न घडे प्राण्याला॥ लय करण्याला आग लागो॥२॥ राजा ज्ञें हें बा-
चे कवन करावें॥ धन्य ह्मणवावें लोका हातीं॥३॥ राजसा तामसा राघ-
वाची भेटी॥ गेल्या जन्मकोटी तरी नाहीं॥४॥ रामदास ह्मणे करितो
निवाड॥ सोडवितो खोड मना तुझी॥५॥

## अभंग ५३७

ऐकावीं लक्षणें विरक्ताचीं शब्द॥ टाकियेला क्रोध जेणें सर्व॥१॥ स्तुती
आणि निंदा करी जो श्रवण॥ परी तेथें मन नाहीं ज्याचें॥२॥ टाकावें तें
काय धरावें श्रवणांत॥ वैराग्याची मात बहुविधा॥३॥ भार्याहीन वि-
प्र होऊनि संन्यासी॥ टाकुनी अन्यासी मुक्त व्हावें॥४॥ रामदास ह्म-
णे शास्त्रार्थ कीं ज्ञान॥ केवीं तें साधन ऐकें मना॥५॥ ॥श्रीशंकरम्॥

## अभंग ५३८.

पश्चात्ताप झाला संसार करितां॥ अथवा देखतां पर दुःख॥१॥ तेव्हां पू-
र्वी तुज जनोक्ती कथिल्या॥ पाहिजे सोशिल्या त्या आधीं बा॥२॥ कि-
त्येकांसी बोध तयाचाही होतो॥ संसारीं पडतो मागुतेनी॥३॥ नाहीं त-
री मग राजस तामसी॥ वैराग्याची फांशी गळां पडे॥४॥ रामदास ह्म-
णे भार्यासह जो कीं॥ वैराग्य सात्विकी तोची धन्य॥५॥ श्रीराम॥७॥

## अभंग ५३९

## समर्थ सांप्रदायी गृहस्थांचे नित्य नेम.

संसार करावा ऐशा त्या रीतीनें॥ मुक्ती होय तेणें करूनियां॥१॥ जन्म-
भूमिकेसी तीर्थी तो अथवा॥ योग्य ठाव घ्यावा हितोपाधी॥२॥ नदीतट
रम्य रम्य तरुवर॥ ऐसें तें सुंदर स्थळ घ्यावें॥३॥ संसारीं बुडतों उद्धा-
रू अनुदिनीं॥ उदास मानुनी राहावें हो॥४॥ रामदास ह्मणे संसारीं

मुक्ती॥ सांगूं तुज मती ऐकतें रे॥ ५॥

अभंग ५४०.

गुरूसी शरण जावें जिवें भावें॥ वेदांत ऐकावे तन्मुखानें॥ १॥ याव-त्काल झाली नाहीं ते पूर्णता॥ तंववरी अनंता आर्जवें हो॥ २॥ साधक आणि सिद्ध पूर्ण तो तीसरा॥ लक्षणें अवधारा त्यांचीं मनीं॥ ३॥ जनोक्ती साहूनी साधनीं लुब्धला॥ साधक तो झाला योगा पेसी॥ ४॥ रामदास ह्मणे सिद्धांचीं लक्षणें॥ ऐकतांची ध्यान लागो ध्यासा ५

अभंग ५४१

न व्हावें संन्यासी बाह्यवेषधारी॥ भार्या असूनी करी भिक्षूधर्म॥ १॥ विष्ठामूत्र करूनी क्षाळी हस्तपाद॥ मुखवाचा शोध गंगातरीं॥ २॥ घटिका एकरात्र राहो नद्यावरी॥ ऐसें नित्य करी नेमालागीं॥ ३॥ घालूनी आसन बरवें बैसावें॥ स्तवन करावें जान्हवीचें॥ ४॥ रामदास ह्मणे अजपा संकल्प॥ करा नाशी पाप केलें तुमचें॥ ५॥

अभंग ५४२

योगाभ्यास मग यथाशक्त्या करी॥ तुटे कर्म दोरी ज्यासेवनें॥ १॥ इडा-मार्गीं वायू यथाशक्त्या ओढी॥ दडपावा गाढी तो कुंभक॥ २॥ पिंगळे-च्या मार्गें सांडावा निश्वास॥ सुषुम्ना वेळनाश होय जान॥ ३॥ पिंगळें करावें युक्तीनें पूरक॥ होईल कुंभक नितुका कीजे॥ ४॥ रामदास ह्मणे करावे रेचक॥ जेणें झाला एक प्राणायाम॥ ५॥ ॥

अभंग ५४३.

ऐसें चढविनां चढे शुद्ध जेव्हां॥ तुटे सर्व तेव्हां कर्मबंध॥ १॥ करावें तें स्नान वेदोक्त मंत्रानें॥ त्रिपुंड्र धारण अष्ट स्थानीं॥ २॥ भूशुद्धि भूतशुद्धि मातृकेचें न्यास॥ आरंभ संध्येस मग कीजे॥ ३॥ शतत्रय जप गायत्रीचा कीजे॥ सहस्रजपीजे गुरूमंत्र॥ ४॥ रामदास ह्मणे यथाशक्तिमती॥ पूजावा श्रीपती मनीं मूर्तीं॥ ५॥

अभंग ५४४.

करूनी पूजन वाचावें पुराण॥ श्रेष्ठ रामायण भागवत॥ १॥ स्तोत्रपाठ कीजे भिक्षेला मागतां॥ प्रीय तो अनंता येणें नामें॥ २॥ आरंभ भिक्षेचा

प्रहराचे वरी॥ मागावी घटिका चारी ग्रामा माजी॥३॥ आणूनितें अन्न भार्येसीं अर्पावें॥ माध्यान्हिका जावें तीर्था वरी॥४॥ रामदास म्हणे माध्यान्हाचा विधि॥ आचरितां सिद्धि होय प्राण्या॥५॥ ॥श्रीरामचंद्रंन॰

## अभंग ५४५

जाऊनियां तीर्थी स्नानासी करावें॥ त्रिपुंड्र लावावें ह्या रावनिनें॥१॥ आसन मृगचर्म पात्र तो भोंपळा॥ योगियांची कळा ऐशी धरिजे॥२॥ माध्यान्ह संध्या सूर्य उपस्थान॥ झाल्या ब्रह्मयज्ञ मग कीजे॥३॥ प्रतिक लक्षावा निर्मळ आकाशीं॥ एक्षीं गभस्तीसी करूनियां॥४॥ रामदास चिन्हें सांगे पुरुषांची॥ अवधी काळाची समजे जेणें॥५॥ श्रीरघुवीर.

## अभंग ५४६

षण्मास मरण काळा तो पुरुष॥ होय देख त्यास निश्चयानें॥१॥ नाना वर्ण भासे उद्वेग होईल॥ पिवळा रोगी लभय लाली॥२॥ लक्षण भुजहीन धर्मी चाड नसे॥ थोडकें आयुष्य राहिलें हो॥३॥ वामभुजहीन स्त्री षण्मासीं ज्ञात॥ शिर हीन होत मरण मासीं॥४॥ रामदास ह्मणे प्रतिक लक्षण॥ पाहूनि अवधान ठेवीं काळा॥५॥

## अभंग ५४७

इकडे भार्येनें अन्न शिजवून॥ ठेवावें झांकून पती येतों॥१॥ माध्यान्ह सारूनी आश्रमासी यावें॥ देवासी करावें धूप दीप॥२॥ नैवेद्य दावावा पदार्थ जो केला॥ श्रीवैश्वदेवाला मग कीजे॥३॥ अतिथि पूजावा ग्रास झाल्या द्वार॥ नाहीं हें उत्तर त्या नकीजे॥४॥ रामदास ह्मणे प्रमाण सूत्राचें॥ घेतलें लोकांचे खंडणार्थ॥५॥

## अभंग ५४८

गोग्रासकाढूनी कीजे भागतीन॥ अतिथिआपणदोनघ्यावे॥१॥ तिसरातोभाग भार्येशीं अर्पावा॥ अतिथीतर्पावाआर्ततेनें॥२॥ ग्रासोग्रासीरामम्हणतजेवावें॥ आंचवूनिघ्यावेंतुळशीदळ॥३॥ भिक्षासरलियास्तोत्रेंजीउरलीं॥ पठावींत्या काळींशांतचित्तें॥४॥ रामदासह्मणे बुद्धीचा निश्चय॥ यागर्यीहोयतोचीधन्य॥५॥

## अभंग ५४९

करावें श्रवण ऐकावें पुराण॥ शेष घडी तीन दिन राहे तो॥१॥ साळूनीप-

दहस्न संध्या आरंभावी॥ सरस्वती ध्यावी ब्रह्मदेवी॥२॥गभस्ती मंडल नेत्रांनीं लक्षावें॥ मरण पाहावें येणें आपुलें॥३॥ वेनें उणें भासे षण्मासीं मरण॥ नव्हीं जरी न्यून मास तीन॥४॥ रामदास ह्मणे दक्षिणभागीं उणें॥ दों मासीं मरणें हा नेमहो॥५॥

## अभंग ५५०

वामभुज कोरहीन दिसेल जेव्हां॥ एक मासीं तेव्हां मरण हो॥१॥ मध्यें छिद्र देखे उरले दाहा दीन॥ सधूम्र दर्शन उरले पांच॥२॥ ज्वाला निघे ऐसा गभस्ती अस्तासी॥ अवधी मरणासीं प्रहर आठ॥३॥ द्विज्ञात गायत्री नियमें पढावी॥ मग ते ह्मणावी रामरक्षा॥४॥ रामदासह्मणे सायंकाळ कर्म॥ अलिप्त अति वर्म तेथील हो॥५॥

## अभंग ५५१.

घेउनीयां वीणा बांधूनि घुंगरू॥ तल्लीन वीसरू कीजे देहा॥१॥ यामार्ध देवास नृत्यें आळवावें॥ घुंगरू सोडावें बैसूनियां॥२॥ अभंग दोहरे ध्रुपद पद आर्या॥ प्रार्थावें गुरूवर्या ऐशा नेमें॥३॥ एक प्रहर ऐसा झाल्या शेजारती॥ करूनी श्रीपती निजवावें॥४॥ रामदास ह्मणे कुशासनावरी॥ शय्याते त्यावरी करुनी निजे॥५॥

## अभंग ५५२.

शय्या दोन कीजे न करावी एक॥ काय हा विवेक जरी पुसशी॥१॥ यासाठीं मज आहे आधार बळकट॥ मनीं धरी वाट मी जें बोलें॥२॥ अर्धरात्रीं रती भार्येशीं करावी॥ आपुली सेवावी शय्या पुन्हा॥३॥ न दुसरे पुन्हां रतीलागीं कीजे॥ न तेथें होइजे आसक्त त्या॥४॥ रामदास ह्मणे आसन वसन॥ आजपकारण ठेऊनि निजे॥५॥ श्रीराम्

## अभंग ५५३.

पुसे मन स्वामी भार्या पुत्रवती॥ त्यावी वनाप्रती कां सांगाती॥१॥ मनाची पूर्णोक्ती ऐकूनी बरवी॥ अपुत्रिका त्यावी ऐसें सांगे॥२॥ संसार भार्या न त्या संसारीं मुक्ती॥ नव्हे प्राण्यांप्रती दास होतां॥३॥ ऐसा जो सं[illegible] लागों तया धन्य॥ चांडाळ तो अन्य संसारिक॥४॥ रामदास ह्म[illegible] चा लेख दिसे आह्मां लागीं॥५॥

## अभंग ५५४

अतिथी यम नियम त्या संसारीं न जोडे ॥ तो मागता पडे दुष्ट नर्की ॥१॥ कापूनियां गळे वैश्वदेव केला ॥ काय विश्वंभराला डोळे नाहीं ॥ २ ॥ परगच्या चित्तांत निंदा खोंचविल्या ॥ कपिला मारिल्या तीन शत ॥ ३ ॥ कुटाळी करीत अनृत वदन ॥ इतुकें पडत नित्य गांठी ॥ ४ ॥ रामदास म्ह- णे कलियुगीं संसारीं ॥ तयांचे पदरीं ठेवणें हें ॥५॥

## अभंग ५५५

असो त्या दुष्टांशीं काय आह्मां काम ॥ जोडावा श्रीराम हेंचि आतां ॥१॥ पश्चात्ताप झाला त्या समयीं पुत्र ॥ असल्या सर्वत्र त्यासी दीजे ॥ २ ॥ म- ग तें एकाकीं अरण्य सेवावें ॥ नसलिया न्यावें भार्येलागीं ॥ ३ ॥ दैवयो- गें वनीं प्रसूत जरी झाली ॥ करावी हवाली बंधूच्या ते ॥ ४ ॥ उभयपक्षीं जरी नसलिया कोणी ॥ ठेवावे ते वनीं दास ह्मणे ॥ ५ ॥ ॥श्रीशंकर॥

## ब्राह्मण आचारभ्रष्ट झाले त्यांचें खंडन.

## अभंग ५५६

कशी तुह्मा लज्जा या सेवेन येते ॥ लुब्ध केलीं चित्तें चाकरीतें ॥१॥ ब्राह्मणांचा जन्म सर्वांचा तो गुरू ॥ ते तुह्मी चाकरू शूद्रांचेरे ॥ २ ॥ अति- नीच अविंध माहार चांभार ॥ त्याचे ते चाकर झालां तुह्मी ॥ ३ ॥ कचि- त् कोपें तेणें उद्धरावी आई ॥ त्याची ते बढाई तुह्मां वाटे ॥ ४ ॥ रामदास ह्मणे समजा अवघड ॥ जनोक्ती निवाड ह्मणुनी करी ॥ ५ ॥ श्रीशंकर

## अभंग ५५७

अन्नवस्त्रदाता आमुचा धर्मात्मा ॥ या सेवनीं आह्मां तुल्य देवा ॥ १ ॥ देवा तीर्था जातां पायां ते पडती ॥ लाज नाहीं चित्तीं त्या राजाला ॥ २ ॥ नीच जाती तुह्मी पायां हो पडतां ॥ लवकर जोडितां नरका लागीं ॥ ३ ॥ ॥ आपुला तो धर्म त्या दुष्टीं टाकिला ॥ तुम्हींही आपुला कां टाकीतां ॥ ४ ॥ रामदास ह्मणे राहा तुह्मि सूखी ॥ आह्मांसी कां दुःखी करितां हो ॥ ५ ॥

## अभंग ५५८.

## विरक्तांस उपदेश

करूं नये कदा संग्रहो धातूंचा" तोही नको ॥१॥

लोभाचा विटाळ सर्वदां धरावा॥ विधि आचरावा सांगीतला॥२॥संसा-
र जे सार ह्मणतील जन॥ तयांचें दर्शनही न कीजे॥३॥पूर्णाचीं कथिलों
अशेष लक्षणें॥ आड येती विघ्नें तीं सांगतों॥४॥रामदास ह्मणे साध-
क सिद्धांचें॥लक्षण दोघांचें सांगीजेल॥५॥

अभंग ५५९

आचरण ऐसें आचरितां योगी॥ सिद्धपद भोगी देहीं आपुल्या॥१॥
नैराश्य पुरुष लोकांत देखून॥ करिती सन्मान एक स्तविती॥२॥घेती
उपदेश करिती सन्मान॥ लुब्धलें मग मन त्या माझारी॥३॥पांचां-
त पहिला ऐसा तो जडला॥ त्या मागें लागला स्पर्श विषय॥ ४ ॥
रामदास ह्मणे पापें रगडिती॥ तिसऱ्याची प्राप्ती झाली तेथें॥ ५ ॥

अभंग ५६०.

आसन वसन धोत्रेंही अर्पिती॥ ऐसें तों गोंविती स्पर्श विषय ॥ १ ॥
पक्वान्न मिष्टान्न भोजन करविती॥ सुगंध लेप देती बुका पुष्प॥ २॥
पांचही विषय जडले मागुती॥ उपदेश बहुतीं घेतलासे॥३॥वर्षां-
त करवी पादुका पूजन॥ ऐशा मिसें धन जोडी मग॥ ४॥ रामदास ह्म-
णे ज्यां ज्यांनीं वंदिलें॥ त्यां त्यांनीं निंदिलें परि सुटेना॥५॥श्रीराम॥

अभंग ५६१

पूर्णतेची आशा हे विघ्न जाणावी॥ मग पडे गर्यी पूर्णता त्या॥१॥शि-
ष्य करावया जो किमपि न गुंते॥ तयासी अप्राप्त प्राप्त होय॥२॥न बो-
लिलों हें मी आपुल्या मनानें॥ जानकी रमणें बोलविलें॥३॥ या वच-
ना कोणी वाईट मानील॥ नर्कासी जोडील तो चांडाळ॥ ४॥ रामदास
ह्मणे आज्ञा मज देवा॥ करूनियां सेवा घेतलीसे॥५॥श्रीशंकरम्॥

अभंग ५६२

पूर्ण झाला त्याची लक्षणें.

मुका षंढ पंगू आंधळा बधिरा॥ भिक्षु मुग्ध स्वरा या संयुक्त॥ १ ॥
हें मिष्ट तें कडू स्वाद जया नाहीं॥ सत्य मित पाहीं वाक्‌ तो मुका॥ २॥
ह्मणावा तो षंढ ...गाचें बा मन॥ बाळा कीं तरुण सम स्त्री ज्या॥ ३ ॥
भिक्षार्थ गमना ...ना॥ न जाय वासना इतर काजा॥ ४॥

रामदास ह्मणे हे तिघे कथिले॥ सांगतां उरले तिघेजण॥५॥ श्रीशं

अभंग ५६३

पाहे वेष परी न पाहे जो दूर॥ सोंहळा होतो परदृष्टी नाहीं॥१॥ बहिरा- तो कठोर निंदा कीं स्तवन॥ ऐके परी मन तेथें नाहीं॥२॥ मुग्ध तो विष- य सामर्थ्य इंद्रियां॥ स्त्रुतापरी शय्या ज्या जनाची॥३॥ ऐसा नित्य युक्त योगींद्र जो पूर्ण॥ तयाचे चरण माझे शिरीं॥४॥ रामदास ह्मणे या चर- णांवीण॥ जरी भेटे तरी आण त्याची॥५॥ ॥ इति रामदासकृत

अभंगसमाप्त.